# निवेदन

माझे मित्र श्री. प्र. श्री. नेरूरकर हे शिक्षक, कादंबरीकार, कथाकार, आणि मार्क्सवादी विचारवंत म्हणून प्रसिद्ध आहेत. पण त्यांना लोकगीते जमविण्याचा पण छंद आहे. त्यांनी परिश्रमपूर्वक अनेक कोकणी लोकगीते जमविली. त्यांचेच प्रकाशन "कोकणी लोकगीते" या शिर्षकाखाली आम्ही आज करीत आहोत. असे बोल भाषेतील साहित्य प्रसिद्ध करण्याने आपण आपल्या भाषेला समृद्ध करीत असतो. काव्यरसाची मेजवानी आणि भाषा समृद्धी या दोन्ही गोष्टी नेरूरकरांच्या या गीत संपादनातून सिद्ध झाल्या आहेत. हा गीतसंग्रह प्रसिद्ध करताना मंडळास फार समाधान वाटत आहे.

४२, यशोधन
मुंबई — ४०० ०२०
२६ जानेवारी १९८८

**सुरेन्द्र बारलिंगे**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती
मंडळ.

माझ्या कोकणभूमीला व कोकणातील
समग्र कोकणी माणसांना

# कोकणी लोकगीते आणि मी

लहानपणापासूनच कोकणी ( म्हणजे सर्वसामान्यपणे ज्या बोली भाषेला कुडाळी किंवा मालवणी भाषा म्हटले जाते ) लोकगीतांनी माझे संवेदना विश्व आतून बाहेरून संपूर्ण भरून व भारून टाकलेले. याच ग्रंथाला मी जोडलेल्या माझ्या एका कोकणी लोकजीवन व कोकणी लोकगीते या संदर्भातील लेखात मी त्याचा काहीसा ( संपूर्ण नव्हे ) आलेख मांडला आहे. १९५३ ते १९६२ सालापर्यंत मी सावंतवाडीजवळच्या व तेरेखोल खाडीवरच्या किनाऱ्याला लागून असलेल्या बांदे गावी, तेथील 'पंचम खेमराज स्मारक विद्यालया'त माध्यमिक शिक्षक म्हणून अध्यापकीय काम करीत असताना कोकणी लोकसाहित्याचा मागोवा घेण्याचा व शक्य तर त्याचे संकलन करण्याचा ध्यास मला लागला. बांदे गाव गोमंतकाच्या किंवा गोव्याच्या सरहद्दीला थेट मैलोगणती भिडलेल्या. गोवा मुक्तीसंग्राम त्यावेळी अटीतटीचा त्याच्या शेवटच्या निर्णायक पर्वात जाऊन पोचलेला. माझाही सहभाग या मुक्तीसंग्रामाला जवळून व दीर्घकाळ लाभलेला. ते दिवस विलक्षण संघर्षाचे, रोमांचकारी व भारलेले होते. आचार्य अत्रे यांच्या घणाघाती संपादनाखाली निघणारे 'दैनिक मराठा' हे वृत्तपत्र आपली एक झुंजार भूमिका मराठी पत्रकारितेच्या पूर्वापार बाण्याला अनुसरून पार पाडीत होते. माझे भाग्य असे की त्या काळात गोवा मुक्तीसंग्रामाच्या अखेरच्या टप्प्यापर्यंत 'दैनिक मराठा'चा गोवा सरहद्दीवरचा प्रमुख वार्ताहर म्हणूनही मी काम करीत होतो. माझ्या त्या काळात कोकणातील या गोवा सरहद्दीवरील प्रदेशातील खेडोपाडी होणाऱ्या भटकंतीत मला खेड्यांत कोकणी बोलीभाषी स्त्रीपुरुष माणसे भेटायची. फावल्या वेळात त्यांच्याकडून कोकणी लोकगीते व लोककथा मला हृदय भरून ऐकायला मिळायच्या. शिवाय माझ्या विद्यार्थ्यांकडूनही मी कोकणी लोकगीते गोळा केली. त्याना मी कोकणी ग्रामीण परिसरात फिरताना कोकणी बोली, त्या बोलीतील म्हणी, वाक्प्रचार, कोकणी दंतकथा, देवस्थानाभोवती प्रचलित असलेले लोकसंस्कृतीचे संकेत आणि बोलीभाषेच्या जुन्या व नव्या आयाबायां बाप्यांकडून अजूनही त्याना पाठ असलेली कोकणी लोकगीते कागदावर उतरून घेऊन ती जमा करण्याचा एक अनोखा साहित्यिक छंद लावला. त्यांच्या शालेय जीवनातील हस्तलिखित मासिके, भित्ती-पत्रे व वर्गप्रकल्प यासाठी त्यामुळे या विद्यार्थ्यांना विषयाचा तुटवडा पडला नाही. कोकणी लोकसाहित्याचे अनेक हस्तलिखित अंकही त्यांनी काढले.

मालवणपासून ते बांदे भेडशी दोडामार्गपर्यंतच्या परिसरातील माझ्या विद्यार्थी-विद्यार्थिनींनी माझ्यावर आपण आपल्या आई आजी आजोबांकडून गाऊन घेतलेल्या व वहीत लिहून घेतलेल्या कोकणी लोकगीतांचा वर्षाव केला असेच मी म्हणेन. त्यात बांदे गावात व परिसरात राहणाऱ्या मुस्लीम व ख्रिश्चन समाजातील आयाबायांनी देखील आपल्या आठवणी-तील कोकणी लोकगीते आपल्या मुलामुलींना गाऊन दाखविली व ती त्यांनी वहीत उतरून घेऊन मला दिली. १९६२ साली मी पुनः मुंबईत आलो व स्थायिक झालो. त्यावेळी माझा मुंबईत प्रा. डॉ. दि. ग. नाईक व माझे जिव्हाळ्याचे मित्र श्री. गु. फ. आजगावकर चालवित

असलेल्या 'कोकण मराठी डायलेक्टस्' या संस्थेशी संबंध आला. या मंडळींनी आपुलकीने मला आपल्या संस्थेत सामील करून घेतले. (आजही मला त्याची खंत वाटते. जितके लक्ष या संस्थेच्या कार्याकडे मी द्यायला हवे होते तेवढे मला मुंबईतील नंतरच्या माझ्या जीवनाला लागलेल्या वेगळ्या साहित्यिक वळणामुळे देता आले नाही.) ९ सप्टेंबर १९६४ रोजी 'कोकण मराठी डायलेक्टस्'चा एक खास अंक डॉ. दि. ग. नाईक, प्र. श्री. नेरूरकर व गुं. फ. आजगावकर यांच्या संपादनाखाली निघाला. त्याच अंकात माझ्या 'कोकणी लोकगीत संग्रहा'च्या ग्रंथाची प्रकाशन जाहिरात ठळकपणे प्रसिद्ध झाली होती. मी तेव्हा-पासून माझ्याकडील गोळा झालेल्या कोकणी लोकगीतांचे संशोधनपूर्ण संकलन व वर्गीकरण करायला सुरुवात केली. एवढेच नव्हे तर 'कोकण मराठी डायलेक्टस्' या संस्थेने मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयात कोकणी लोकसाहित्य आणि विशेषतः कोकणी लोकगीते या विषयावर माझी दोन व्याख्याने घडवून आणली आणि मला आजही अभिमान व आनंद वाटतो की त्या व्याख्यानांच्या अध्यक्षपदी मराठी भाषेचे व लोकबोलीचे प्रकांड जाणकार व अभ्यासक कै. कृ. पां. कुळकर्णी हे होते. त्यांनी माझी ही कोकणी लोकगीतांची पारख उचलून धरली व माझे खूप कौतुक केले. डॉ. म. गं. माडखोलकर व दुर्गाबाई भागवत यांनीही माझ्या या कोकणी लोकगीतांच्या संकलन संशोधनाबद्दल आपुलकीची उत्सुकता त्या काळात दाखविली व ती ग्रंथरुपाने प्रकाशित व्हावीत म्हणूनही मला मार्गदर्शन व सहाय्य केले.

मात्र मीच या कार्याला अपुरा पडलो. गेली पंचवीस तीस वर्षे हे 'कोकणी लोक-गीतां'चे संकलन ग्रंथरूपाने कोकणी व बिगर कोकणी महाराष्ट्रीय वाचक व अभ्यासकांसमोर येणे राहून गेले. परंतु भारतीय स्वातंत्र्य संग्रामकाळापासूनचे माझे जिव्हाळ्याचे मित्र व विचारवंत तत्त्वज्ञ डॉ. सुरेन्द्र बारलिंगे यांनी माझ्या या 'कोकणी लोकगीत संग्रहा'बद्दल व्यक्तीशः व 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळा'चे अध्यक्ष म्हणूनही उत्सुकता दाख-विली. एवढेच नव्हे तर माझ्या या कार्याला त्यांनी गती दिली. म्हणूनच आज ही 'कोकणी लोकगीते' ग्रंथरूपाने मराठी माणसांसमोर येत आहेत. या ग्रंथातील समग्र कोकणी लोकगीते म्हणजेच कोकण भूभागात प्रचलीत असलेली सगळी लोकगीते नव्हेत. हा कोकणी लोकगीतांचा संग्रह म्हणजे कोकणी सुशिक्षित व सुबुद्ध माणसाला कोकणच्या लोकजीवनाचा व लोकसाहि-त्याचा शोध व अर्थ धुंडाळण्याच्या दृष्टीने करावयाचा आरंभीचा म्हटले तर प्राथमिक बालबोध व लहानसा, खरं म्हणजे तुटपुंजाच संशोधन प्रयोग आहे. या संग्रहातील गीतरूपाने संकलित झालेला कोकणी लोकसाहित्याचा ठेवा हा तसे पाहिले तर 'कच्चा माल' ( raw material ) आहे. त्यातून उद्याच्या कोकणी मातीत जन्मलेल्या कुणाही कोकणप्रांताच्या सुपुत्राला परिपक्व असा कोकणी लोकसाहित्याचा ठेवा ( finished product ) चिकाटीच्या व निष्ठावंत अशा संशोधकवृत्तीने कोकणी माणसांना व कोकणाबाहेरील लोकसाहित्याच्या अखिल भारतीय भाषांतील अभ्यासकांना उपलब्ध करून देता येईल. या कोकणी लोकगीतांतून उमटलेला कोकणी माणूस, मग ती स्त्री असो, पुरुष असो, लहान मूल असो वा तरुण तरुणी असोत, मोठा मानवी स्वभावाचा इरसाल नमुना आहे यात संशय नाही. हा या लोकसाहित्यात उमटलेला कोकणी माणूस वरपांगी काहीसा तिरसट, एकांगी, तुच्छतावादी ( cynic ) व माणूसघाणा जरी वाटत असला तरी आतून तो त्याच्याच गावात खडका पाषाणातून खळा-

खळा पाझरणाऱ्या झऱ्याच्या किंवा अरीच्या पाण्यासारखा निर्मळ, प्रेमळ व परस्पर आपुलकीची ओढ लागलेल्या असा संवेद्य व हृद्य असा माणूस आहे. कोकण परिसराच्या काहीशा दरिद्री वातावरणात तसा तो मनाने खरोखरच श्रीमंत आहे. रीतीरिवाज, लोकाचार, सामाजिक रूढी यात तो गुंतला पण अडकून रहात नाही.

असा हा 'कोकणी लोकगीतां'चा संग्रह 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळा' तर्फे प्रसिद्ध होत आहे याचा मला आनंद वाटतो. हा कोकणी लोकसाहित्याचा ग्रंथ तयार होत असताना माझ्यावर प्रेम करणाऱ्या व माझ्या या संशोधनवृत्तीबद्दल उत्सुक असलेल्या माझ्या अनेक सुहृदांचे मला सहाय्य झाले आहे. माझी भाची व आताची सौ. शामा कांबळे हीने ही सर्व लोकगीते नीट लिहून मला दिलीत. मराठीतील एक नामवंत कवी, कादंबरीकार व लेखक सुरेश कदम यांनी ( तेही कोकणातील वेंगुर्ल्याकडला ) या लोकगीतांची नीट क्रमवार मांडणी करून त्यांची मुद्रण प्रत मला तयार करून दिली. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयातील पूर्वीच्या साहाय्यक ग्रंथपाल कु. मराठे व आताच्या सौ. दाते हीने मला ही सर्व कोकणी लोकगीते मराठीत टंकमुद्रित करून दिली. 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळां'चे कार्यवाह व माझे स्नेही श्री. य. दा. देशमुख, तसेच ग्रंथनिर्मिती अधिकारी व माझे तरुण स्नेही श्री. सावे यांनी मला झालेले सहाय्य मी मोलाचे मानतो. आणि माझे चाहते, स्नेही व मराठीतील अग्रेसर प्रकाशक व मुद्रक प्रभाकर देसाई यांनी या कोकणी लोकगीतांचे देखणे मुद्रण व रचना करून दिली यांच्याशी मला आपुलकीची जाणीव व कृतज्ञता येथे व्यक्त करावीशी वाटते. माझी पत्नी सौ. उमा नेरूरकर हीने प्रारंभापासूनच मला धीर व आधार दिला.

हा 'कोकणी लोकगीतां'चा संग्रह प्रकाशित होताना मला विशेष आधार ज्याने दिला तो माझा एके वेळचा विद्यार्थी व आजचा कणकवली येथील नामवंत असा मराठी भाषेचा अध्यापक जी. ए. सावंत याचा मला विशेष उल्लेख करावासा वाटतो. जी. ए. ने माझ्या जवळचा हा संग्रह समग्र अभ्यासून व पुनः संशोधून या संग्रहाला विवेचनात्मक टीपा व विश्लेषण लिहिले आहे. खरे म्हणजे माझ्यावर अत्यंत अकृत्रिम व उत्कट प्रेम करणारा माझा हा विद्यार्थी व अध्यापक जी. ए. सावंत यानेच कोकणी लोकसाहित्याचा विशेष ध्यास व शोध घ्यावा अशी माझी अंतरीची इच्छाही मी इथे व्यक्त करीत आहे. जी. ए. सावंत याने जी या गीतसंग्रहाला टीपा विवेचनाची जोड दिली त्यामुळे ह्या संग्रहाला खास असे संशोधनात्मक परिमाण लाभले आहे यात संशय नाही. त्याचे सर्व श्रेय जी. ए. चे एकट्याचे आहे हेही इथे मला नमूद करावेसे वाटते.

हा संग्रह मी माझ्या कोकण भूमीला व कोकणी माणसांना गीतभरल्या अंतःकरणाने अर्पण करीत आहे.

२४ फेब्रुवारी १९८८ — **प्र. श्री. नेरूरकर**

१३ कुलवाडी, साहित्य सहवास

वांद्रे ( पूर्व ) मुंबई ४०००५१.

## एक

पाऊस गं घडोघडी
मोगग गं पाणी भरी
आई नी गं चिंता करी
लेक गेली परघरी
बंधुनी गं काइ बोले¹
नको आई चिंता करू
बहिणीबाईला हाडुक जातय
भाऊजा काही बोले
बहिणीचा गं दूर गाव
नदी भरल्या नको जाऊ
पाऊस गं घडोघडी
मोगग गं पाणी भरी

¹ ही ओळ अशीही म्हटली जाते : बंधु नीगं काइ बोले

## दोन

गुंडयार फोडल्या फुटाना............फुटाना
मगे मियांतां धाट्नार फोड्लंय
बरां बरां मीयां खाल्लंय् खाल्लंय्
वायट वायट मीयां आडयांत् टाकलंय
आडयांन् माका चारो दिलो
चारो मियां गायक घातलंय
गाईन् माकां शान दिल्यान
श्यान मियां वायनाक काढ्लय
वायनान माका कतीकुंडो दिलो
कतीकुंडो मीयां जात्यांत टाकलंय
जात्यान् माकां पीट दिल्यान
पीट मियां भाणीन टाकलंय
भाणीन् माकां गुळो दिलो
गुळो मियां कायलींत टाकलंय
कायलीन माकां वडो दिलो
वडो मिया शिक्यार ठेयलंय
शिक्यावयलो बोकल्यान् खाल्लो
दोन धपके मारलय।

## तीन

येव येव कुड्या मोगऱ्या
सम्ना पळाल्यो डोंगऱ्या ॥ ध्रु ॥
आंगरी मांगरी जायंचं कळं
जायंचं कळं दवान्यान
उठगा मामा कंवान्या
मामी जाता मांवगाक
जाता नदी जांवेद
नदी पैलाडी पांवडे
नदीक इलो लोंडो लोंडो
भिजलो गो मामीचो गोंडो
गोंड्यांत होती साडी
साडींत होता रुपया
माझा मामा शिपाया
शिपायाची होडी खडपा फोडी
खडपात होती आवोली
आवोली बुडली नायाला
कंकन धोंड खोयाला
ककनले धोंडे कागाचे
अशी अशी बंधु आमचे गगाचे

असो असो राग करतले
देवळापाठीं दडतलें
असो असो समींदर भलो रे

## चार

खाल्ती गनोबा न्हाय धुय गे
वरती भावुराय धोतरा धुता
धुता धुता अभीच रवली
येवढा शिरंगार काय गे
लाडुची आई लाडुला बोले
बुगडी लेऊन घाल गे
जळो तुजी बुगडी बिगडी
शंकर बायचं पाय रे
खाल्ती गनोबा न्हाय धुय गे।

# पाच

पुढल्या दागा पाटल्या दागा ।
जॉगा उंपल्यां ।
किल्यागो जॉन्या उंपल्ये ।
धोंगां चिरडतत ।
किल्यागो धोंगानो चिरडनात ।
गाखनो गाखाना ।
किल्यांर गाखन्या गाखानय ।
धर्नान जेवंक घाल्डाना ।
किल्यॅक गे धननी जेवक घाल्डीस नाय ।
जेवक घाल्डीस नाय ।
ल्हाकूड खोल्डो आर्नान नाय ।
ल्हाकूड खोल्डो आर्नान नाय ।
किल्यॅ रे गाखन्या ल्हाकूड खोल्डो आर्नान नाय ।
ल्हाकूड खोल्डो आर्नान नाय ।
कोंयतो नाय . कोयतो नाय ।
कोयतो दडाल्डो सुनारांचे साळेत ।
सुनारांच साळेत ।
धर्नान दडाल्डी माळेयेन माळयेत ।
कार्डाखोल्डो हाडीना ।
पाळ कोयतो देयना ।
पाळ कोयतो मुडयच्या खांचीक ।

## सहा

आल्या पाल्याची भाजी रे मुळ्या
म्हावळंगीची साल
वसान फुगडी घाल रे मुळ्या
वसान फुगडी घाल

## सात

घाटावरसून घाटावरसून, कवडं पळान गेलं
मामान् हाडेलं धवळं पांडं
धवळ्या पाडयांचा जॉन जॉन
जांबळी वुडल्यान् वाट् वाट्
जांवळीचा जांबाळ पिकयाला
गोऱ्या मामाक विकयाला
गोरो मामा चोर चोर
चोराच्या हातीक ढोंग सुळी
पाणयाक जातल्याची चुनकळी
चुनकळेचां लगीन लगीन
भेडल्या माडावरसुन वगीन वगीन
भेडल्या माडाक आग आग

# आठ

आयल्याडीं कनकीं पयल्याडीं कनकीं
मधिं वाय जानकीं पिटो कांडीं
पिटो कांडून उंडे करी
उंडे धयले शिक्यार
शिक्यावयले हले बोकल्यान
बोकल्यार मींयां टोणको मारलेंय
टोणको माजो गायाक पोंचलो
गायान माकां हार्थी धोंडो दिलो
हार्थी धोंडो मींयां भावभयर्नीक दीलो
भावभयर्नीन माकां काजाळ कुंकूम दिल्यान
काजाळ कुंकूम मींयां गंगेंत टाकलेंय
गंगेन माकां मास्सो दिलो
मास्सो मींयां वयल्या खुंटार ठेयलेंय
वयल्या खुटावयलो वागीन हेल्लो
वागी माजो मास्सो दी
नायजाल्या मांकां पाख दी
पाख तुजां वायटोळां
मास्सो माजो यंगलो[1].

१. इथे दुसरा विकल्प असाही असे: मासो माजो नोंगटोळो.

## नऊ

फळयेवल्या फळयेवल्या बावल्यांनु गो

कोनाची वाट बघताहात

दादाची

दादा आमचो येता हा

तळयेंत पाय धुता हा

सात नाल फोडला हा

सगळ्या पोरांक वाटतां हा

एक पोर उरयेला

तेका होरान न्हयेंच धाळीक पुरयेला

टीप : हेच गीत ' दादा ' एवजी ' मामा ' ला उद्देशूनही म्हटले जाते

# दहा

तुज्या ओंपाळ्या वुडी माज्या ओंपाळ्या वुडी
चिकण चिकण माती चिकण चिकण माती
तीं दिलीं तीं दिलीं कुंभाराच्या हातीं ...कुंभाराच्या हातीं
कुंभारान माकां गाडगीं खोलीं दिलीं
गाडगीं खोलीं मींयां वांईत जोयलेंय
वांईन माकां पाणी दिलां
तां मींया तोंशनिक शिंपलां
तोंशिर्नीन माकां तौस्सां दिलां
तौस्सां माजां गायरेंत वुडलां
गायरेंन माकां ह्यान दिलां
ह्यान मियां वायनाक काडलां
वायनान माका कनयो दिल्यो
त्यो मींयां काळ्या कोंवडेक घातल्यो
काळ्या कोंयडेन मांका कवांट दिलां
कवांट मींयां आकाकडे दिलंय
आकान केल्यान डबरोभर
धोंवाक घातल्यान टबलोभर
आमकां घातलां शिपी शिपी
आपुन खाल्यान मडकी खरडून

मडक्यां गॅलां गडगडून

आका गॅला फडफडून[१]

(१) इथे अशीही ओळ म्हटली जाते : आका गॅला चडफडून

## अकरा

देवळापाठिं देवळापाठिं डुकरसो खंकता

काका आमचो काका आमचो बंदुकसो ठोकता

काकी आमची काकी आमची मसालोसो कुट्टा

सोनु आमचा सोनु आमचा खांवकसा मागता

जी डवली उचलली

ती कपाळार मारली

रडत गेला पाणयाच्या वाटे

भजी दिल्या बोगी खायना

लाडू दिल्या बोगी रावलां

# बारा

चिंचवयल्या चिंचवयल्या लाल्तुका गों
व्हरांक न्हयगो इल्लेहत
कोण कोण इल्लेहत
सासू माऊ इल्लो हा
काय काय हाडल्यानी, काय काय हाडल्यानी
साडी चोळी हाडली हा
साडिचोळी मीयां घेवचय नाय
त्यांच्या वांगडा जांवचय नाय
चिंचवयल्या चिंचवयल्या लाल्तुका गों
व्हरांक न्हयगो इल्लेहत
कोण कोण इल्लेहत
धोव न्हयगों इल्लोहा
काय काय हाडल्यानी, काय काय हाडल्यानी
नथ युगडी हाडली हा
नथ युगडी घेतलय
म्हनी पानी देतलंय
त्यांच्या वांगडा जातलंय

१ माऊ – मांधो – सासरा

## तेरा

ईतभर बामनाची हातभर शेंडी
तळ्याच्या बांधार जावन संध्या करी
संध्या करी गा । संध्या करी
संध्या करताना देखला मासा
जानीया तोडून घातला फासा
मासा म्हणे मी पळान जायन
बामन म्हणे मी तळान खायन
संध्या करी गा । संध्या करी
ईतभर बामनाची हातभर शेंडी

## चौदा

भाऊ आला तो चाकर नोकर
बहीण आली ती भेटायाला
वैनी ऐसी बोले.........
ननान आली ती लुटायाला ग
बंधु ऐसा बोले
बहिनी जऊं आम्ही एके ताटीं
आणि भावजय ऐसी बोले
बहिणी जेवूं या दहिभात
भावजय ऐसी बोले.........
दह्याचे केले ताक
ननांद ऐसी बोले......
जेवूं या ताकभात
भावजय ऐसी बोले
ताकाची केली कढी
बंधु ऐसा बोले
आम्ही जेवूं कढिभात
भावजय ऐसी बोले ......
कढी घातली ती मी मानायांक
बंधु ऐसा बोले

तेल घाल माथ्याक
भावजय एसी बोले,
तेल नाहीं घरांत
बंधु एसा बोले
बहिणीक पोंचव मांहरीं
पोंचवूंक गेली आया बाया
पावूंक गेली ती एका ठाया
पाठीं उरली ती भावजया.

## पंधरा

रुपांपां पायाचो, 'को रं ज़ाता तो ?'
चिकलांतला चिकलकोणा
'काय गो म्हणता तां ?'
बगलय मेर पद्मशेट्टी
'गाळी दीता हो ?'
ओगी राव गे रुनपुतळं
झक मारता तो ।'

## सोळा

वकुळयाच्या झाडाखांट । माज्या मामाने रस्ता केला
वशाल्या करंडा फणी । माझ्या मामीनं पाठवीली
वकुळयाच्या झाडाखांट । माझ्या बापानं रस्ता केला
वंशाल्या साडी चोळी । माज्या मांयनं पाठवीली
वकुळयाच्या झाडाखांट । माझ्या चुलत्यानं रस्ता केला
वंशाल्या काजाळ कुंकू । माझ्या वयनीनं पाठवीली
वकुळयाच्या झाडाखांट । माझ्या भयनीनं रस्ता केला
वंशाल्या नथ वुगडी । माज्या मित्रन्यांन पाठवीली

## सतरा

नवऱ्या थाळा सुंभदागा
मनगां हाडर्ली उधागा
शिंपी नाचता पाटल्या दागा
धोबी नाचता फुडल्या दागा

## अठरा

देवळापाटीं देवळापाटीं
धुकड्सो धुमता[1]
मामा आमचो मामा आमचो
सुमाकसो जोकता[2]
मामी आमची मामी आमची
मसालोसो कुट्ता
तुळसा आमचा तुळसा आमचा
खावंकसा मागता
उकलली डवली ती मारली कपाळार
तां गेला रागान्
केळीं दिल्या घेयना
लाडू दिल्या घेयना

१ इथे अशीही ओळ म्हटली जाते : डुकर ढेकता, डुकर ढेकता
२ ,, ,, : बंदुक जोखता, बंदुक जोखता

## एकोणीस

काळी निगे चंद्रकळा
फाटली ती पदराला
डोळा घाली ती अंधाराला
चिंता पडली घेणाऱ्याला
सावकार देइना उदाराला
पावसानी निगे लागे
जसा लागेचा हडे तडे
माते माझ्या गे गावाकडे
पिकले वेलदोडे ।

## वीस

हे पाटयेक ते पाटयेक झिगी मिगी दोरा
गोऱ्या मामा पाना खा, पाना खा
गोरे बहिणीक आणूक जा, आणूक जा
गोरी बहीण बाई चुडया फाडयांची
तूं येरे हत्ती घोडयांनी, हत्ती घोडयांनी
हत्ती घोडा सांवरया,
सांवरकाठी मोडली मोडली । बैलाच्या पाठिवर झोडली झोडली।
बैल पडला धाळी, धाळी
चिमणी रडते ढाळी ढाळी
नवऱ्याच्या शेल्याने दुखां पुसता
नवऱ्याचा शेला जळाला, जळाला
आगीत ना एक इंगळा
इंगळा गेला विझून

## एकवीस

येथें येथें नाचरं मोरा
बाळ घाली चारा तो खारे मोरा
चारा खा, पाणी पी भुर जा
आंब्यागे गुडूंबा चिंचेगे मालवणी
सुर्यासारखा बाळ झाला बाई गे गौळणी.

## बावीस

मानाचे उभे आमचे[1] ______
माटवाच्या दारीं त्याला तुपाचे डबे
मानाचे उभे आमचे वांदेकर
माटवाच्या दारीं, त्याला तुपाचे डबे
मानाचे उभे आमचे गोळवलकर भावोजी
माटवाच्या दारीं, त्याला तुपाचे डबे
मानाचे उभे आमचे पारकर भावोजी

(१) इथे ज्याचे नाव घ्यायचे ते नाव घालायचे.

## तेवीस

शेला मारुनी जागी केली
फुलांत फूल मधी, सुरंगी बहुवास
माझा नी वडिलानी, गुरु घेतला रामदास
कापाची सरपळी, जानीया गोनावली[1]
विमलबाई ग माझी, शेला टाकुनी नीज आली
लाडक्या भरतार, शेला मारुनी जागी केली
भरतार काई बोले, माझी मोहना कोठें गेली
विमल गो वाये माझे हसत दारी आली.

(१) असाही शब्द येतो : गोंदावली

## चोवीस

माज्या कुकुमा रंग चढे ।
दारांतले गे तुळशी
बागडे गे तुझे खुर
बहू गे माझ दीर
सूर्यासारखे भरतार
माजी नी सासूबाई
सोनेरी तीची नीरी
तिच्यानी गे पुण्याईने
माज्या कपाळीं लालचिरी
दारातले निगे तुळशी
पाणी पडले एकीकडे
माज्या कुकुमा रंग चढे

## पंचवीस

घाणा जो घातीला । खंडीभर भाताचा
मांडव गोताचा । दणका भारी
घाणा जी घातीला । खंडीभर भाताचा
आधी मान देती कुंकवाला
आधी मान देती हळदीला

## सव्वीस

कवाल्यान कवातो पाळेलो
बाप्पा जाय मावाडयाक तो तानलो
हाडगे आई गाडग्यानी पानी पानी
एयोक गाडगो कीतक्याचो
बाप्पा सांगता रुपयाचो
आई सांगता पावल्याचो
रुपयो झालो खोटो खोटो
बाप्पाक झील झालो मोटो मोटो
पास्टाक पोंचासो, पास्टाक पोचांसो।

## सत्तावीस

आंब्याक् आमो वटाकलो रे[1]
घोडो निसाटलो, घोडो निसाटलो
अन्ना जाय मावाडयाक
शो शेलो इसारलो
जारे भाऊ शेलो पावून ये...... ॥ धृ ॥

(१) वटांगलो

## अठ्ठावीस

आपला तुरा दैवाचा
गोठा भरला बैलाचा
इयाण लोटी लोटाना
तळीला पाणी भेटाना
अशी ग तळी रंगाची
सातय देवळां भिंगाची
सातय देवळानी राशी करा
मावले बायच्या[1] राशी भरा
राशींत[2] गावला दुरु
तां गे बाये खोटा खोटा
प्राण गेला मोटा।

(१) शेशी भरा (२) शेशीत

# एकोणतीस

दारीं फुलली चटक चांदणी
वयनी दिवा लावगे
ननंद चालली सासरला
अनान काय देवू गे
एकावर एक सात टाटा
नंदे जोकता नाय गे
दारी फुलली चटक चांदणी
वयनी दिवा लावग
ननांद चालली सासरला
अनान काय देवूं गे
एकावर एक सात तांबये
नन्दे जोकंत नाय गे
दारी फुलली चटक चांदणी
वयनी दिवा लावगे
ननान् चालली सासरला
अनान काय देवूं गे
पेल्यावर पेले सात पेले
नन्दे जोकंत नायगे

दारी फुलली चटक चांदणी
अनान काय देवूं गे ?
पाटावर पाट सात पाट
नन्दे जोकते नाय गे
दारी फुलली चटक चांदणी
अनान काय देव गे ऽ ।

## तीस

इल्यात् पावन्यानु बसा बसा
खळयात् डाळयेचो टळको आसा
जेयतालात् तर पेज आसा
खाताल्यात् तर पान आसा
जाताल्यात् तर सकळ आसा
पिपळा मुडसून्[1] वाट आसा
इल्यात् पावन्यानु बसा बसा

(१) बुडसून

# एक

चौव बाजु समिंदर मधी आही कील्ला । त्या बाई कील्यांत
गाई चरता । त्या बाई कील्यांत तवशीन घातीली ॥ धृ ॥

त्या बाई कील्यात चिवडण घातली
एका एका गाईचे । घागर घागर दूध
त्या बाई दुधावर । पिंवळी शाया
शकुशाला[1] नेसली गनोबाची माय।
गनोबा बळी की शक्रोबा बळी
गनोबानें फोडीली मंगीळाची पळी
मंगीळाची पळी फोडून यशवंत झाले
यशवंत होवूनी नगराशी गेले.
नगरच्या बायानी काय आनंद केला
चार बाजू सम्बय पेटून आरस केला.

(१) शकराला

## दोन

झिम् झिम् झिमाक चिचावळी । झिम् झिम् झिमाक चिचावळी
कीरष्णाने मांडली चेंडूफळी । कीरष्णाने मांडली चेंडूफळी
कीरीष्णाने चेंडू झुगारीला । कलमटाळी अडाकला
कलमटाळी कडाडली । देवकामाता रडू लागली
नका नका रडू देवकामाता । तुम्हाला कीरीष्णा झाला नाही
झाला नाही म्हनू कसा । झाला म्हनू कसा

## तीन

दारी ऊगावली चटक चांदणी । वयनी दीवा लाव गें
ननान जाते सासरीला । अनान काय देव गें
हंड्यावरती सात हंडे । नंदे जोगते नाय गें
दारी उगावली चटक चांदणी । वयनी दीवा लावगें
पराती वरती सात पराती । नंदे जोगते नायगें
समय वरती सात समय । नंदे जोगते नायगें
वाटयावरती सात वाटये । नंदे जोगते नायगें
शेणीवरती सात शेणी । नंदे जोगते हायत गें

## चार

बैल बांधरे राटाला काय । पाणी जावंदे पाटाला ॥ धृ ॥
केगदीच्या बेटाला

केंगदीची पांच केगदे । गवरीच्या ववशाला
गवरीचा ववसा बाई फुलांनी दरवळे । उदकांनी परमळे ॥

पाणी जाय दे पाटाला काय । गुलाबाच्या बेटाला
गुलाबाची पाच गुलाबे । गवरीच्या ववशाला
गवरीचा ववसा बाई फुलानी दरवळे । उदकानी परमळे ॥

पाणी जावंदे पाटाला काय । आवुल्याच्या बेटाला
आवुल्याची पांच आवुली । गवरीच्या ववशाला
गवरीचा ववसा बाई फुलानी दरवळे । उदकानीं परमळे ॥

पाणी जावंदे पाटाला काय । शेवतीच्या बेटाला
शेवतीची पांच शेवती । गवरीच्या ववशाला
गवरीचा ववसा बाई फुलांनी दरवळे । उदकानी परमळे ॥

पाणी जावंदे पाटाला काय । मालयेच्या बेटाला
मालयेची पांच केसरें । गवरीच्या ववशाला
गवरीचा ववसा बाई फुलानीं दरवळे । उदकानीं परमळे ॥

## पांच

कारेती अळा भाजीयेला । अजून माझा बंधुहि नेयाला नाहीं
कारेती अळा धरीयेला । अजून माझा बंधुही नेयाला नाही
कारेती रुजू घातली । अजून माझा बंधुही नेयाला नाही
कारेती एक पान आले। ,, ,,
कारेती दोन पाने आली। ,, ,,
कारेती तीन पाने आली। ,, ,,
कारेती चार पाने आली। ,, ,,
कारेती पांच पाने आली। ,, ,,
कारेती सहा पाने आली। ,, ,,
कारेती सात पाने आली। ,, ,,
कारेती फुलुं लागली । ,, ,,
कारेती धरु लागली । ,, ,,
कारेती वाढू लागली । ,, ,,
कारेती चिरुं लागली । ,, ,,
कारेती चुरू लागली । अजून माझा बंधुही नेयाला नाही
पाणी टाकले चुटकन । हा बंधू आला लुटकन
आलास बंधवा बस बाजेवरी । डोईचा मंदील ठेव खुंटीवरी ।
अंगातला कोट हा ठेव । पायातला जोडा हा ठेव धरणीवरी ।
सासऱ्याला पुसू लागली । चांदीची धुरगडी होरुपाचि चिलाम

धुरगढी ओढीतल्या मामाजींनों । बंधु आला नेयाला

धाडतास काय मोहरी । धाडतास काय मोहरी

गुणाची गुणवंती गे । आम्हां काय पुसशी पुस आपल्या सासूपाशी ।

सोन्याची तबकडी हो रुप्याचा आडकित्ता

पान खातल्या सासुबाईनों बंधु आला नेयाला । धाडतास काय माहेरी

आम्हां काय पुसशी । पुस आपल्या जावेपाशी

तांब्याची मडकी हो रुप्याचा वाळमांड । भात वाढतल्या जाववायनु

सदा भागीरथी आम्हां काय पुसशी । पुस आपल्या दिरापाशी

पुस आपल्या दिरापाशी

सोन्याचा नांगर हो रुप्याचा पळीव रुप्याचा पळीव

जोत धरवल्या भावोजीनु बंधु आला नेयाला । धाडतास काय माहेरी

गुणाची गुणवंती गे सदा भागीरथी । आम्हां काय पुसशी

पुस आपल्या नंदेपाशी

मोत्याची सुफली हो । मोत्याची गुफली । खेळतल्या आकावायानो

बंधु आला नेयाला । धाडतास काय मोहरा.

गुणाची गुणवंती गे सदा भागीरथी ! आम्हां काय पुसशी

पुस आपल्या भरतारा पाशी

चांदीची दऊत रुप्याची लेखणी । लिवतल्या भरतारानो

बंधु आला नेयाला । धाडतास काय मोहरा

घे गे तू एक महिना रजा । एक महिना रजा मी घेयाची नाही

मायरीच्या वाटेला जायाचीं नाहीं ।
घे गे तू दोन महिने रजा । दोन महिने रजा मी घेयाची नाहीं
मायरीच्या वाटेला जायाची नाही ।
घे गे तू तीन महिने रजा । तीन महिने रजा मी घेयाची नाही
मायरीच्या वाटेला जायाची नाही
घे गे तू सहा महिने रजा । सहा महिने रजा मी घेयाची नाहीं
मायरीच्या वाटेला जायाची नाही
काढीले चिंचेचे सोप । फोडीली बारजेची पाठ
दाखविली मायरीची वाट
बारजा गेली खेळायाला । बारजा गेली खेळायाला
खेळतां खेळतां रात्र झाली । खेळतां खेळतां रात्र झाली
सासऱ्याला पुसू लागली । अहो हो मामाजीनू होशा
दारीची कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
सासूला पुसू लागली । अहो हों सासूबईनू होश दारीच्या
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
दिराला पुसू लागली । अहो हो भावोजीनू होशा दारीची
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचे राज
नंदेला पुसू लागली । अहो हो आकाबायनु होशा दारीची
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचे राज
जावेला पुसू लागली । अहो हो जावबाईनु होशा दारीची

## सहा

बारजा गेली खेळायाला । बारजा गेली खेळायाला
खेळता खेळता रात्र झाली । खेळता खेळता रात्र झाली
सासऱ्याला पुस् लागली । अहो हो मामाजीनू होशा
दारीशी कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
सासुला पुस् लागली । अहो हो सासूबाईनु होशा दारीच्या
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
दिराला पुस् लागली । अहो हो भावोजीनूं होशा दारीची
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
नंदेला पुस् लागली । अहो हो आकाबायनु होशा दारीची
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
जावेला पुस् लागली । अहो हो जावबाईनु होशा दारीची
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
नवऱ्याला पुस् लागली । अहो हो भरतारानो होशा दारीची
कवडा उघडशा । नाही बारजे कामकाज कर माहेरीचा राज
गेली व पहिल्या वन्नां । थयसर होता गुराखीचा दादा
अरे रे गुराख्या दादा । गळ्यातली गळेसरी देते रे तुला
अंजन डाव सांग रे मला

गळयातली गळेसरी नको ग बाई । अंजन डाव ठाऊक नाहीं
गेली बा दुसऱ्या वन्नां । थयसर होता म्हशीराख्या दादा
अरे रे म्हशीराख्या दादा । गळयातली गळेसरी देतें रे तुला
अंजन डाव सांग रे मला

गळयातली गळेसरी नको ग बाई । अंजन डाव ठाऊक नाहीं.
गेली बा तीसऱ्या वन्नां । थयसर होता मेंढ्या राख्या दादा
अरे रे मेंढ्याराख्या दादा । गळयातली गळेसरी देतें रे तुला
अंजन डाव सांग रे मला

गळयातली गळेसरी नको ग बाई । अंजन डाव ठाऊक नाहीं.
गेली बा चवथ्या वन्नां । थयसर होता हत्तीराख्या दादा
अरे रे हत्तीराख्या दादा । गळयातली गळेसरी देतें रे तुला
अंजन डाव सांग रे मला

गळ्यातली गळेसरी नको ग बाई । अंजन डाव ठाऊक नाही.
गेली बा डोहाजवळी । काढीला सर्व अलंकार । ठेविला धोंडयावरी
घेतली डोहांत उडी । मातेच्या सपनीं गेली
दारीची केळ वावली । दारीची तुळस वावली
भावाच्या सपनी गेली । भाऊ मातेला पुसू लागला
बारजा भयन गे सपनी आली । गेला बा भयनीच्या घरी
सासुला पुसू लागला । बारजा भयीन खय गे हायी
बारजा भयीन गेली मायेराला । दारीची तुळस वावली
गेला बा शेताच्या मेरा । भयनीला शोधु लागला
गेला बा वन्नां नी वन्नां । थयसर होता गुराख्या दादा
अरे रे गुराख्या दादा । पांच पेडाची रे इनी सांग रे सख्या माझी
गळ्यातली गळेसरी देईत होती । अंजन डाव हटकीत होती.
गळ्यातली गळेसरी घेतली नाही । अंजन डाव सांगला नाही
गेला बा ढवा जवळी । ढवांत टाकली उडी
बारजेला बाहेर काढीली । शींपली अमृत कुपी
बारजा ही जागृत झाली । आली बा घराजवळी.

## सात

बाय ते पंढरीचे वाटे, बाय ते पंढरीचे वाटे । केगदीचे घन्न दाटे
केगदीची पांच केगदे तोडूनी आणावी । आणूनी ठेवावी
तबकडी व वाटी

शेल्याचा शृंखारा करितो निवारा । रामाच्या दरबारात
सिता घाली वारा

बाय ते पंढरीचे वाटे, बाय ते पंढरीचे वाटे । गुलाबाचे घन्न दाटे
गुलाबाची पांच गुलाबें तोडूनी आणावी । आणूनी ठेवा ती
तबकडी ताटी

शेल्याचा शृंखारा करितो निवारा । विठोबाच्या दरबारात रुक्मीणी
घाली वारा

बाय ते पंढरीचे वाटे, बाय ते पंढरीचे वाटे । आवुल्याचे घन्न दाटे
आवुल्याची पांच आवुली तोडूनी आणावी । आणूनी ठेवावी
तबकडी ताटी

शेल्याचा शृंखारा करितो निवारा । कृष्णाच्या दरबारात राधा
घाली वारा

बाय ते पंढरीचे वाटे, बाय ते पंढरीचे वाटे । चाफ्याचे घन्न दाटे
चाफ्याची पांच चाफी तोडूनी आणावी । आणूनी ठेवावी
तबकडीत ताटी

शेल्याचा शृंखारा करितो निवारा । विष्णूच्या दरबारात लक्ष्मी
घाली वारा

बाय ते पंढरीचे वाटे, बाय ते पंढरीचे वाटे । चमेलीचे घन्न दाटे
चमेलीची पांच चमेली तोडूनी आणावी । आणूनी ठेवावी
तबकडीत ताटी
शेलयाचा शृंखारा करितो नियारा । शंकराच्या दरबारात
पार्वती घाली वारा

## आठ

दोन तीन बैलांच्या लागल्या झोंबी हो लागल्या झोंबी
तीथे माझी मासोळी हरपली हों हरपली
धाकट्या दीराला गांवसरी[१] । हों गांवसरी[१]
धाकट्या दीरानें काय माझं केलं । हों काय माझं केलं
सासू सासऱ्याला सांगत गेलं । हों सांगत गेलं
सासू सासऱ्यानी काय माझं केलं । हों काय माझं केलं
दोन, तीन चाबुक चमकाविले । हों चमकाविले
तें बाई चाबुक दुरच्या दुरी । हों दुरच्या दुरी
माझे माहेर पंढरपुरी । हों पंढरपुरी
पंढरपुरच्या काय बाय साजा । हों काय बाय साजा
पंढरपुरच्या बांगड्या साज्या । हों बांगड्या साज्या
येतां जातांना खाळखुळ वाज्या । हों खाळखुळ वाज्या
या या वाटेनं कोण कोण गेल्या । हों कोण कोण गेल्या
त्या त्या वाटेने गवळणी गेल्या । हों गवळणी गेल्या

(१) गंवसली । हो गंवसली

## नऊ

कमळी कमळी दिवा लाव । दिवा लाव । दीवा गेला वाऱ्यानें
कमळीला नेली चोराने । चोराच्या हातून सुटली ।
पलंगाखाली लपली.

## दहा

सोन्याची सुफली हों । मोत्यानी गुफली
धाकटी चंद्रावळ बाय । खेळाया गुंतली
खेळतां खेळतां गे । कृष्णाने पाहिली, कृष्णाने पाहिली
धरीली पदरी, धरीली पदरी
सोड कृष्णा पदर रे । सोड गोविंदा पालव
तुझ्या रे वयतागान । मळ्यांत जाईन
मळ्यांत जाऊन मीं । आबोली होईन
तूं होशी आबोली तर । मीं होईन माळी जों
माळी जों होऊनी मीं । आबोली खुटीन
आबोली खुट्न मीं । हार जों करीन
हार जों करून मीं । विकाया नेईन, विकाया नेईन
तुझ्या रे वयतागान । जलांत जाईन
जलांत जाऊन मीं । मासोळी होईन
तूं होशी मासोळी तर । मीं होईन कोळी जों

कोळी जों होऊन मीं । जळांत जाईन, जळांत जाईन
जळांत जाऊन मीं । जाळे जों टाकीन
तुला गे पकडीन.

## अकरा

आई मीया आई मीया । पेड पुजू जाते
जा गे तूं जा माझे लेकी । जा गे तूं जा माझे लेकी
आई मला आई मला नेसाया नाही । घे गे ती वयनीची साडी
वयनी बाई वयनी बाई रागे भरली । दादा बाई,
दादा बाई डोळे मोडीतो
आई मीया आई मीया । पेड पुजू जाते । जा गे तूं जा माझे लेकी
आई मला आई मला कानांत नाही । घे गे ती वयनीची कुडी
वयनी हीं रागे भरली । दादा हीं डोळे मोडीतो
आई मीया आई मीया पेड पुजू जाते । जा गे तू जा माझे लेकी
आई मला आई मला नाकांत नाही । घे गे ती वयनीची फुली
वयनी हीं रागे भरली । दादा हीं डोळे मोडीतो
आई मीया आई मीया पेड पुजू जाते । जा गे तू जा माझे लेकी
आई मला आई मला अंगात नाही । घे गे ती वयनीची चोळी
वयनी ही रागे भरली । दादा हीं डोळे मोडीतो.

## बारा

राधा रुसली सुंदरा । जाऊन बैसली मंदिरा
माळ ठेविली तबकांत । माझ्या गळयाची शप्पथ राधे
घाल गे गळ्यांत
कुडी ठेवीली तबकांत । माझ्या गळयाची शप्पथ राधे
घाल गे कानात
राधा रुसली सुंदरा । जाऊन बैसली मंदिरा
फुली ठेवीली तबकांत । माझ्या गळयाची शप्पथ राधे
घाल गे नाकात
राधा रुसली सुंदरा । जाऊन बैसली मंदिरा
बिचवा ठेवीला तबकात । माझ्या गळयाची शप्पथ राधे
घाल गे पायात
राधा रुसली सुंदरा । जाऊन बैसली मंदिरा.

## तेरा

काय मागशी गे काय मागशी गुजरणी।

मागीन मागीन हो पतीराया कुडा

सोनाराकडे जाईन, कुडा घडविन, कानी चढवीन।

कान शोभले, मन रमले

काय मागशी गे काय मागशी गुजरणी।

मागीन मागीन पतीराया माळ

सोनाराकडे जाईन, माळ घडविन, गळी चढविन,

गळा शोभला, मन रमले

काय मागशी गे काय मागशी गुजरणी।

मागीन मागीन पतीराया नथडी

सोनाराकडे जाईन, नथडी घडविन, नाकी चढविन,

नाक शोभले, मन रमले

काय मागशी गे काय मागशी गुजरणी।

मागीन मागीन पतीराया बांगड्या

सोनाराकडे जाईन, बांगड्या घडविन, हाती चढविन,

हात शोभले, मन रमले.

काय मागशी गे काय मागशी गुजरणी।

मागीन मागीन पतीराया तोडा

सोनाराकडे जाईन, तोडा घडविन, पायी चढविन।

पाय शोभले, मन रमले

## चौदा

हाकव रे गाडीवाल्या गाडी । गाडी डुलत जाय, गाडी डुलत जाय
पोर नेसली पैठणी साडी । पदर वाऱ्यानें जाय, पदर वाऱ्यानें जाय
पोरीच्या कपाळाला कुकुमाचा टीळा। पोर देखणी हाय, पोर देखणी हाय
पोरीच्या अंगामध्यें मदनी चोळी । पोर खेळत जाय, पोर खेळत जाय
पोरीच्या तोंडामध्यें पानाचा विडा । पोर थुकत जाय, पोर थुकत जाय
पोरीच्या हातामध्यें रंगीत बांगड्या । पोर नटत जाय, पोर नटत जाय
पोरीच्या पायामध्यें चांदीचा तोडा । पोर ठुमकत जाय, पोर ठुमकत जाय
हाकव रे गाडीवाल्या गाडी । गाडी डुलत जाय, गाडी डुलत जाय

## पंधरा

लग्नाच्या मंडपी । राम सीता खेळती । डाव आला रामापाशी
सीता आली काकुळती । डाव द्या ओ प्राणपती
राम सोडीतो बाण । गंगा भागीरथी सासुबाई
सून अंजान हायी । जाऊन सांगा सोनारापाशी, तोडा नाजूक हो बनवा
राम सोडीतो बाण । गंगा भागीरथी सासुबाई
सून अंजान हायी । जाऊन सांगा कासारापाशी
बांगड्या लानच[1] हो बनवा । बांगडया नाजूक हो बनवा
राम सोडीतो बाण । गंगा भागीरथी सासुबाई
सून अंजान हायी । जाऊन सांगा सोनारापाशी
गांठा लहानच हो बनवा । गांठा लहानच हो बनवा
राम सोडीतो बाण । गंगा भागीरथी सासुबाई
सून अंजान हायी । जाऊन सांगा शिंप्यापाशी
चोळी लानच हो बनवा । चोळी लानच हो बनवा
राम सोडीतो बाण । गंगा भागीरथी सासुबाई
सून अंजान हायी । जाऊन सांगा माळ्यापाशी
गजरा लानच हो बनवा । गजरा लानच हो बनवा

(१) ल्हानच असाही शब्द येतो.

## सोळा

ढवळ्या वारुवरसुन गवर बैसून आली
बापाने पाहीली भुकेली झाली । नाय बापा भुकेलो घरी जेवून आलो
घाटीया सासर । हरकाचा खाना
कोंकणी मायार । बुगडेचा लेना
ढवळ्या वारुवरसुन गवर बैसून आली, गवर बैसून आली
आईने पाहीली भुकेली झाली । भुकेली झाली
नाय आई भुकेलो । घरी जेवून आलो
घाटीया सासर, जोंधळ्याचा खाना
कोकणी मायार, नथीचा लेना
ढवळ्या वारुवरसुन गवर बैसून आली, गवर बैसून आली
चुलत्याने पाहीली भुकेली झाली । भुकेली झाली
नाय काका भुकेलो घरी जेवून आलो । घरी जेवून आलो
घाटीया सासर, बाजरीचा खाना । कोकणी मायार, आंगठेचा लेना
ढवळ्या वारुवरसुन गवर बैसून आली । गवर बैसून आली
बहीणीने पाहीली भुकेली झाली । भुकेली झाली
नाय आका भुकेलो घरी जेवून आलो । घरी जेवून आलो
घाटीया सासर, मक्याचा खाना । कोकणी मायार । माळेचा लेना.

## सतरा

बारा वरषे झाली माझ्या गनपतीला ॥ धृ० ॥
पांच वरषे झाली माझ्या गंगागवरीला
पोटी नाही पुत्र बाळ सांगू कोणाला
पिरतीच्या सासुबाई गेल्या गावाला
पोटी नाही पुत्र बाळ देऊं कोणाला

## अठरा

रस्त्यावरचे कावळे । रस्त्यावरचे कावळे
सारीपट्ट्यानी खेळत होते । माझे मावळे
रस्त्यावरचे कीर । रस्त्यावरचे कीर
सारीपट्ट्यानी खेळत होते । माझे दीर
परड्या मधली भाजी । परड्या मधली भाजी
मागारपाण करीत होती । माझी आजी
करांद्याची कापा । केनी केनी चाफा
रस्त्यावरचा भाता । रस्त्यावरचा भाता
सारीपट्ट्यांनी खेळत होता । माझा भाचा

## एकोणीस

घस फुगडी, पाय लुगडी, पायाची माती गळून गेली
दोडगी पोर थकून गेली ।

## वीस

(१)

सारु थाय सारु पांच कने घालुं
एक झाला मोठा । सय आला पोटा
सयच्या कानां बुगड्या । बघा आमच्या फुगड्या
आमच्या फुगड्या नेटाच्या । सून केली पाटाची
चोळी दिली चिटाची । नांव ठेवला दीराचा
असो दीर कुकडो । खोबऱ्याचो तुकडो
खातां खातां गोड । जिबेला आला फोड
जिबेचा फोड फुटेना । नाना कांबळी उठेना
नाना कांबळी उठला । जिभेचा फोड फुटला

(२)

सारू बाय सारू । पात्र कने घालू
एक झाला मोठा । सई आली पोटा
सईच्या कानी बुगडया । आम्ही घालू फुगडया
असे चीट चांगले । वडाला नेऊन टांगले
आम्ही लेकी थोराच्या । कानी बुगडया मोत्यांच्या
एक भुई सारवू । पांच खडे मांडू
एक खडा उडाला । पाण्यात जाऊन बुडाला
पाणी माझी माय ग । लाथा बुक्कया खायला
लाथा बुक्कया सोसेनात ।
जीव कसा जातो । डोळे वटारून पाहातो
डोळ्यात होता वाऊ । वडील माझी जाऊ
वडयों कशा कापिती । गोफण कशी मारिती
भाउजींनी देखीली । खुंटयाने टोकीली
असा खुंटा द्वाड ग । हाताला आला फोड ग
हाताचा फोड फुटेना । दारचा पाहुणा उठेना
हाताचा फोड फुटला । दारचा पाहुणा उठला

## एकवीस

एका गे नगरीचा शीरयाळ राजा । शीरयाळ राजा त्याची चांगुना नार
चांगुना नार, त्याचा बा चिल्लाया बाळ । त्याचा चिल्लाया बाळ
चिल्लाया बाळ बा । गेला खेळायाला
दारी हा अतीथी आला । अतीथी आला
नारीने जेवण केले । जेवण कले
उठा उठा बाबा तुम्हीं । आंघोळी करा, आंघोळी करा
आंघोळी करा तुम्हीं । भोजन सारा । भोजन सारा
असला भोजन नलगती आम्हां । आमचे भोजन कुकडीया मांस

......( अपूर्ण १ )

## बावीस

दिला दिला शेवू । भायर कृष्णा देवु
भायर कृष्णा देवू नारी । दार उघड
नाय दार उघडायची । नाय आत घ्यायची
अजून स्वामी तुम्ही । खयीं हों होता

यमुनेच्या तीरी । चरत होत्या गाई
थयसर नारी मला । उशीर झाला
हातातली आंगठी । काय केली स्वामी
अर्जुनाचा बेटा । आम्हां लेखे भाचा
भाचा गेला लगना । जाया मी दिली
दिला दिला शेवू । भायर कृष्णा देवू
भायर कृष्णा देवू । नारी दार उघड
नाय दार उघडायाची । नाय आंत घेयाची
अजून स्वामी तुम्हीं । स्वयीं हों होता
यमुनेच्या तीरी । चरत होत्या गाई
थयसर नारी मला । उशीर झाला
गळ्यांतली कंठी । काय केली स्वामी
अर्जुनाचा बेटा । आम्हां लेखे भाचा
भाचा गेला लगना । जाया मी दिली
दिला दिला शेवू । भायर कृष्णा देवू
भायर कृष्णा देवू । नारी दार उघड
नाय दार उघडायची । नाय आंत घ्यायाची

अजुन स्वामी तुम्ही । खयीं हों होता
यमुनेच्या तीरी । चरत होत्या गाई
थयसर नारी मला । उशीर झाला
हातातला कडा । काय केला स्वामी
अर्जुनाचा बेटा । आम्हा लेखे भाचा
भाचा गेला लगना । जाया मी दिली.

## तेवीस

एका गे पाटलाच्या सात जणी सुना
गेल्या वा शेताच्या मेरे । शेताच्या मेरे
पहीली नार गे । बोलती झाली
तुम्हाला जाव बायनु । न्याया कोण येती
येईल माझा गे दादा

दुसरी नार गे बोलती झाली
तुम्हाला जाव बायनु न्याया कोण येती
येईल माझा गे काका

तीसरी नार गे बोलती झाली
तुम्हाला जाव बायनु न्याया कोण येती
येईल माझा गे बाप

चवथी नार ही बोलती झाली
तुम्हांला जाव बायनु न्याया कोण येती
येईल माझी गे भईन

पांचवी नार ही बोलती झाली
तुम्हांला जाव बायनु न्याया कोण येती
येईल माझा गे मामा

सहावी नार ही बोलती झाली
तुम्हांला जाव बायनु न्याया कोण येती
येईल माझी गे माता

सातवी नार ही बोलती झाली
तुम्हांला जाव बायनु न्याया कोण येती
येईल कालीया नाग

सबद नागानी ऐकून घेतला । लागला राज मारगी
आला बा घराजवळी । येवूनी राहीला वाडवनीच्या कोनी
आता राई येईल वाडवन नेयाला । मधल्या बोटाला डवच करीन
राईच्या जावानी वाडवन नेली । थयसून नाग झडाकला
जावूनी बैसला विबटीच्या कोना । आता बाई राई येईल
घिरट मांडाया
मधल्या बोटाला डवच करीन । राईच्या जावानी घिरट मांडीली
थयसून नाग झडाकला । गेला बा राईच्या खोलीत
झाला गे जेवण खावण । झाला बा शेण नी भांडा
गेली बा । अंथरुण घातीला । थयसर
कालीयाने डंवच केला । डंवच केला
उठा उठा सासुबायनु । दीवा नी लावा वत्ती
आमची आली सरगीची चिठ्ठी । सरगीची चिठ्ठी नाय गे
पानाची पट्टी
आमच्या भीती गुल्लाराच्या । आमची घरे पाषाणाची
नाहीं गे मुंगीला वाव । थयसर खयचा कालीया नाग

उठा उठा जावबायनु । दिवा लावा वत्ती
आम्हांला आली हों सरगींची चिट्ठी
सरगीची चिट्ठी नाय गे पानाची पट्टी
आमच्या भींती गुल्लाराच्या । आमची घरे पाषाणाची
नाहीं गे मुंगीला वाव । थयसर खेंचा कालीया नाग
उठा उठा आक्कावायनु । दिवा लावा वत्ती
आम्हाला आली हो सरगींची चिट्ठी । सरगींची चिट्ठी नाय
गे पानाची पट्टी
आमच्या भींती गुल्लाराच्या । आमची घरे पाषाणाची
नाहीं गे मुंगीला वाव । थयसर खेंचा कालीया नाग
उठा उठा भरतारानु । दिवा लावा वत्ती । दिवा लावा वत्ती
आम्हांला आली हो सरगीची चिट्ठी
सरगींची चिट्ठी नाय गे पानाची पट्टी
आमच्या भींती गुल्लाराच्या । आमची घरे पाषाणाची
नाही गे मुंगीला वाव । थैयसर खेंचा कालीया नाग

## चौवीस

एका गे नगरीचा निमणी राजा । त्याचा बा अर्जून पाटील
अर्जून पाटलांनी गांव घेतला । गांव जों घेऊनी तळा रचीला
त्या बाई तळयात न पडे पाणी । न पडे पाणी झाल्या दे
थोरली सून
थोरली सून देवून स्वयंपाक कोण करील । थोरली सून नाय तर दे
थोरला झील । थोरला झील देवून गांवकी कोण करील ।
थोरला झील नाय तर दे मधला झील
मधला झील देवून । शेती कोण करील
शेती कोण करील । तर दे मधली सून
मधली सुन देवून शेण कोण भरील
मधली सून नाय तर दे धाकटा झील
धाकटा झील देवून गुरां कोण राखील
धाकटा झील नायतर दे धाकटी सून
धाकटी सून तळा देवू लागली

अंग, अंग गं, कं गाई म्हने । तुया गे माहेरी जा गे
माहेरच्या माणसांना भेटून ये गे । आमच्या घरी देव कार्य आहे
मानेला पुस् लागली । अंग, गं वयनी माझे होशी
मला गं तळा देवू केली । देईन अरधे राज्य
बापाला पुस् लागली । अहो हो बाबा माझ्या होशा
मला हों तळा देवू केली । देईन अर्धी दौलत
भावाला पुस् लागली । अंरे रे दादा माझा होशा
मला रे तळा देवू केली । देईन रे ढवळा नंदी
बहीनीला पुस् लागली । अंग, गे वयनी माझी
मला तळा देवू केली । देईन मडकी हंडी
रंभा बसली बाजेवरी । रंभा पाणी किती
आले माझ्या पावला वरती । धन्या वयन्या तुझी
रंभा बसली बाजेवरी । रंभा पाणी किती
आले माझ्या डोक्यावरती । धन्या वयन्या तुझी

## पंचवीस

एका गे नगरीचा दशरथ राजा । त्याची वा कोसल्या नार
त्याचे वा राम लक्ष्मण । त्याची वा सीता ही सून
के गाई सासू हीं गेली बाजाराला । दशरथ गे गेला चावडेला[१]
राम नी लक्ष्मण गेले शिकारीला । तिकडून आला वा जोगी
तुझ्या गे रामाचे सत्त्व नेईन । तुझ्या गे दारांत जट्टा तोडीन
सीता ही बापडी सत्त्वा भियाली । जोगीया भीक्षा वाढू लागली
इगडूली ननाद धावत आली । अगे गे सीते वहीनी
दारीचे कने फुसले दारीचे फुल मोडली । जोग्याने
तुला गे धरली
कौसल्या सासूहि आली बाजारासून । राम नी लक्ष्मण
आले शिकारीसून
दशरथ राजा हें आले चावडेहून । भर शिने झारं गे
दे आम्हां पाणी
अहो हो दशरथ बाप्पा । शीतिच्या हाताचे नय घेया पाणी
शीता ही जोगीयाची राणी.

(१) चावडीला

# सव्वीस

सुर्याची कन्या राधीका । उठली कोंब्या फाटपटी
लाविल्या दीवा नी वत्ती । काढीलं चंदन भेतळी
साफ़टील्या तांबांच्या चुली । गेली वा गाईच्या गोठ्या
आर्णाला गुळीभर शेण । घेतली गजनी चोळी
घेतला पिवळा पितांबर । घेतली मोठी चुंबळ
गेली वा नीवळी पेंदा । गेली वा तळयाजवळी
काढीला नवलक्ष हार । ठेवीला नीवळी पेंदा
राधेने आंघोळी केली । धुईली मध्यानी चोळी
भरली तांब्या घागर । घेतली मोत्या चुंबळ
घेतली तांब्या घागर । आली वा घराजवळी

उतरली तांब्या घागर । राधेनं स्वयंपाक केला
सासऱ्याचे ताट भरीले । दीराचे ताट भरीले
जावांना जेवूं वाढीले । दीराना जेवूं वाढीले
सासऱ्याचा पलंग सुवारीला । सासयेची बाजू[1] सुवारीली
भरताराचा पलंग सुवारीला । आपली बाजू[1] सुवारीली
घेतली आरशी फणी । राधाही केस उगु लागली
अहो हो भरतारानो होशा । आहे हा सर्व अलंकार
नाही हो नवलक्ष हार । नवलक्ष हार हो नीवळी पेंदा
राधा बा गेली नीवळी पेंदा । थयसर होता गोविंद गवळी
अरे रे गोविंद गवळया । माझा रे दे नवलक्ष हार
नवलक्ष हार नाय माझ्या जवळी । नवलक्ष हार

गे नेला पक्षाने

पकशी फीरे गगनी । राधा ही फिरे धरणी
हार बा नेला गोविंद गवळयानं । गोवींद गवळी

गेला आंबवनी

(१) बाज

## सत्तावीस

आर्गान गाडी बंदर गाडी । या दोघी भयनी
गुलहाराच्या खांदीवरी । बीजली बत्ती
भायखळयावर खोली घेतली । सव्वा रुपायाची
रामुच्या देवळात गर्दी होती । बामण वाण्याची
बामण वाणी सावकार मोठे । गळयामध्ये कंठी
अपेली नाय तर तपेली आणा । वासु आण्याची
दूध नाय तर धारा सोडा । गरम पाण्याची

## अठ्ठावीस

रामेश्वराच्या तळयात बाई । वेंचीत होत्या गळया ग
तिकडसून आले मामाजी माझे । चल सूने घराशी ग
आजून माझी ओटी नाय भरली । मी नाय यायाची घराशी हों
तिकडसून आली सासूबाय माझी । चल सूने घराशी ग
आजून माझी ओटी नाय भरली । मी नाय यायाची घराशी हों
तिकडसून आले भावोजी माझे । चल वहीनी घराशी ग
आजून माझी ओटी नाय भरली । मी नाय यायाची घराशी हों
तिकडसून आली जाव बाय माझी । चल जाये घराशी ग
आजून माझी ओटी नाय भरली । मी नाय यायाची घराशी हों
तिकडसून आली आका बाय माझी । चल वयने घराशी ग
आजून माझी ओटी नाय भरली । मी नाय यायाची घराशी हों
तिकडसून आले भरतार माझे । चल बायजा घराशी ग
आता माझी ओटी भरली । मी हो येते घराशी.

## एकोणतीस

चानन्यांत चाननी सरस चाननी । दारी कशाचा बाग हों
मामाजी बसले फुडल्या दारी । मला वाटते लाज हों
सासुबाय बसली मधल्या खणी । मला वाटते लाज हों
भावोजी बसले फुडल्या दारी । मला वाटते लाज हों
जाव बाय बसल्या मधल्या खणी । मला वाटते लाज हों
आका बाय बसल्या मधल्या खणी । मला वाटते लाज हों
भरतार बसले पलंगावरी । मला कशाची लाज हो

## तीस

एका गे नगरीचा श्रीकृष्ण राजा
त्याची बा के गाई नार
त्याचा या निळकंठ पूत्र । त्याची जीवंता सून
खोली भर मोत्या ही पक्षा चारली
श्रीकृष्णा राजाला कुरुध्द आला
निळकंठ राजाला कुरुध्द आला
जाऊनी बैसला समींदरा वरी

## एकतीस

असा सारवान सरस बाई । कने जों घालावे
असे कने सरस बाई । गोंता जो मांडावा
असा गोंता सरस बाई । जातं जों मांडावे
असे जाते सरस बाई । गहू जों दळावे
असे गहू सरस बाई । पीट जो मळावे
असे पीट सरस बाई । पातं जो लाटावे
असे पाते सरस बाई । करंज्या कराव्या
अशा करंज्या सरस बाई । भाजून काढाव्या
अशा करंज्या सरस बाई । रुमाली बांधाव्या
असा रुमाल सरस बाई । घोडयार बांधावा
असा घोडा सरस बाई । माहेरी पाठवावा
असा माहेर सरस बाई । हसाया खेळाया
असा सासर द्वाड बाई । कोंडून मारतां

## बत्तीस

शंकर पुसे पार्वतीला । अगे गे पार्वती कांते
तुझ्या गे आवरणा कर । तुझ्या गे हरताळका कर
आवरणा केशा कारण । हरताळका केशा कारण
आवरणा पुत्रा कारण । हरताळका चुडया कारण
शंकर गेले शिकारीला । लाविली माळा निशाणी
काढीले कोठारी नाल । काढीला निपर्णा रस
लाविला अगनी मांस । अंगीचा काढीला मळ
त्याचा बा लींपीला बाळ । शिंपीली अमृत कुपी
बाळाला साजिवंत केले । बाळाला ठेवला दरवजावरी
अरे रे बाळा माझ्या होशी । येत्या[1] येऊ देऊ नको
जात्याला जाऊं देऊं नको.
मीया रे आंघोळ करते । शंकर आले शिकारीसून
तुया रे कोनाचा कोन । पार्वती माझी हों माता
ईश्वर माझा हो पीता । तुम्हीं हों आंत जाऊ नको
आई हों आंगुळ करता । काढीली कमरेची सुरी
मारीली बाळाच्या उरी । शीर बा गेले सृष्टीवरी
धड हे राहीले धरणीवरी । पार्वतीने आंघुळ केली

पार्वतीने स्वयंपाक केला । भरली तीन हीं ताटा
तीन गे ताटा कोणाला । शंकर पुसे पार्वतीला
अगे गे पार्वती कांते । तुम्हीं हों गेले शिकारीशी
लावीली माळा नीशाणीं.

(१) येत्याला

## तेत्तीस

देवळा भोंवतारल्या राई । अस्मान फुलल्या जाई
राम खुटीतो कळ्या । शीता गुपीते माळा
उठ उठ भट्टाच्या बाळा । आली रे लग्ना वेळां
मधी धरा अंतर पाठ । जाव दे दोघांची भेट
पाटाच्यात पानी । कीरा मोरा खाती
व्हकलेचे बंधु । कवतीक पहाती
पाटाचा पानी । कीरामोरा खाती
आंव्याचे आंबे । आंव्याचे टाळे
जल्लम घेती । जल्लम घेती.

## चौतीस

सासु सुनेला साद देती । उठ उठ गे पारबती

सासू सूनेला साद दती

सासुनी हो बाई नको मला हाक मारूं
रथ मारीला आंगोपती । हाक मारा त्या धुरपती
दाजीबानी हो दीय । धुरपती जागी करा
कापाची सरपोळी । जांदा[१] या गोंदावली

धुरपती जागी नाही

कोंभ्याच्या फाटफटी । सासू सुनेला साद देती

उठ, उठ गे पारबती

( १ ) जानया ( जानव्या )

## पस्तीस

ग्यँ ग्यँ ग्यँ ग्यँ सख्या म्हारा । सखू चलला घोवां घरा

—

येरे वाऱ्या जोसातल्या
पडरे आंब्या घोसातल्या
पडात तो आंबो माझो
पान सुपारी तूझी

—

मेल्यान माका भुतॅप दिल्यान
सुक्या सड्यार नेवन् सोडल्यान

## छत्तीस

कांजीन राप गे रुकमीनी
कांजीत रावला[1] चवलक हार
कांजीन सारीली । शेनूल्यानी
कने घातले । रांगोळेचे
कांजीन नेसली । पीवळा पितांबर
चोळी घातली । मधनीची
कुंकू लाविला । बामनीचा
कास मारीली । भटनीचीं
कांजीन राप गे । रुकमीनी

(१) गावला : असाही एक पाठ

## सदतीस

तुझ्या झोपाळ्या बुडी । माझ्या झोपाळ्या बुडी
चिकन चिकन माती । ती बाय दिली कुंभाराच्या हाती
कुंभारान माका । गाडगी गुडगी दिली
गाडगी गुडगी मीया । बाईत टाकलय
बाईन माका पाणी दिल्यांन
पाणी मीया तवशीर्नीक घातलय
तवशीनीन माका तवसा दिला, तवसा दिला
तवसा मीया कापून खालय । साला मीया आड्यांत टाकलय
आड्यान माका फूल दिला । फूल मीया देवाक घातलय
देवान माका पेढे दिले । पेढे दिले.

## अडतीस

नको रे बापा । चार म्हशी पांच दाशी
तपा मीं केला । बारा वरसा जोगीयासाठी । रे बापा ।
जोगीयासाठी.

## एकोणचाळीस

आपडये काय चापडये । गंगेसून हाडला बोरुसो
त्याचा वाय दूध कोन खाय । ह्यों बोकूल

## चाळीस

तुझ्या झोपाळया बुडी माझ्या झोपाळया बुडी
चिकन चिकन माती ।
ती दिली कुमाराचे हाती हाती
कुमारान केली गाडगी मडकी
गाडगी मिया बायर हेलय
बायन माका पानी दिला

पानी मिया तौसिनीक सिपला
तौसिनीन माका तौसा दिला
तौसा मिया गोटणीवर फोडला
गोटनीन माका श्यान दिला
श्यान मिया वायनाक काढला
वायनान माका कनयो दिल्यो
कनयो मिया काळे कोंबडेक घातल्यो
काळे कोमडेन माका कवाट दिला
कवाट मिया आकाकडे दिला
आकान त्याचा सामारा केला
तां केल्यान तौलोभर तौलोभर
घोवाक घातल्यान दौलोभर

## एकेचाळीस

वाजत गाजत हळद येते घरां
हळदीने खांबे रंगवा । शीताबायच्या
हत्तीच्या सोंडेत दिला बा भेंडबाजा
लग्नाला येतो राजा रामचंद्र

# बेचाळीस

धुप घाली धुपारती । कापुर जळे वाती
नागोबा सारे पावणे येती । जाग सारे रात्री
धुप घाली धुपारती। कापुर जळे वाती
कृष्णा सारे पावणे येती । जाग सारे रे रात्री
धुप घाली धुपारती । कापुर जळे वाती
गणपती सारे पावणे येती । जाग सारे रात्री
धुप घाली धुपारती । कापुर जळे वाती
गौरी सारे पावणे येती । जाग सारे रात्री

# एक

स्वप्नी सुवासण पाहीली माळावरी
ब्रम्हा विष्णू महेश्वर अनुसुयेच्या बाळावरी
आले हे सर्व देव ब्रम्हा विष्णू हे कोठे गेले
पिंपळाच्या पारी पादुका विसारले
ब्रम्हा विष्णू महेश्वर तीन नावांची एक मुर्ती
अनुसयेला बाळ झाला नाव ठेविला दत्तात्री
घाटीचा गोसावी कोकणी उतारले
दत्तात्री स्वामी माझे भगव्या पा उरले
दत्तात्राय स्वामी माझे कृष्णा तीरीचे रानवले
कृष्णा तो पंचगंगा संगम वाटेवरी
दत्तात्रय स्वामी माझा संध्या करी ते वाटेवरी

## दोन

यौव यौव कुड्या मोगऱ्या
ससो पळालो डोंगऱ्या
डोंगरी मांगरी जायचे कळे
जायचे कळे देवाऱ्याक
उडगा[1] मामा कैवाऱ्याक
जाता तशी जावंदे
होळा[2] पैलाडीग पावंदे
होळाला आला लोंडा
भिजला मामी गे तुझा गोंडा
गोंड्या पैलाडीग काडी
भिजली गे मामी तुझी साडी.

(१) उठगा (२) व्हाळा पैलाडी

## तीन

आकाडी गे एकादशी पत्रू चालला पंढरेशी ।
पत्रू म्हणता पाणी पाणी
देवाच्या गे देवळात विठ्ठला देवानी तळ बांधिला
चौकोनी त्या तळयाचा गे नाव कांही, काशी खंडिता
गे गोरजाबाई
गीरजेन काढीला सरना सुप, हाती माळा ती पवूळाची
शंभून घेतली वनकाठी, शंभून लावीली कांखे झोळी
गीरजा गेली ती म्हालकुडीत, गीरजा पाठीशी परतली
मनीशी चरकली । गीरजेन परदेशा केला पुढा । घराकडे केली पाठ

## चार

देवांत गे देवू थोर–सत्यनारायण देवू थोर
देवा । नारायण देवू थोर. नारायण गे देवू त्याच्या
निगे पुजेसाठी त्या आणिला सव्वा शेर
देवांत गे देवू थोर ——— सत्यनारायण देवू थोर
देवा । नारायण देवू थोर
त्याच्या निगे पुजेसाठी दुध आणीला सव्वा शेर.

## पाच

सीतेचा गे वनीयेस सासू देईना गे घागर।
रामा देईना ती गे घागर रामाच्या गे सत्तावनी[1] पानी पुरइती[2]

मोआनी

सीतेचा गे वनीयेस सासू देईना गे जाता
देवा। देईना ती गे जाता
रामाच्या गे सत्तावनी सीता दळती तळायानी
सीतेचा गे वनीयेस सासू देईना गे मुसाळ देवा।
देईना ती गे मुसाळ
रामाच्या गे सत्तावनी सीता काणती[3] कोपरानी

(१) सतवानी (सत्वानी) (२) पुरवी (३) कांडती

## सहा

आंब्यारे कुडुंबा[1] चिचेके मालणी
सुर्यासारखा बाळ झाला मामी गे गौळणी
हे वाटे ते वाटे तेंडलेच्या वेलावेला
माभीला बाळ झाला धाव गा मामा तेलातेला
बाळाच्या बोंबीखाली मोत्यांचा झेला झेला

(१) 'गोडांब्या' असाही पाठ

## सात

झाली निगे तिनसांज बाळा लक्ष्मी येती झाली । देवा । लक्ष्मी येती झाली । लक्ष्मी गे येती झाली । दिलीप रे तान्हया बाळा शेल्याची घोटी केली । झाली निगे तिनसांज । बाळा आली रे लक्ष्मी । देवा आली रे लक्ष्मी । आली निगे लक्ष्मी । तेलकुंकू घाली गे चुडा येनी गे बाई माझ्या । तुझ्या मानवली गे चुड्या । झाली निगे तिनीसांज बाळा लक्ष्मी येती झाली.

## आठ

राधाकृष्ण परस्परी रंग खेळता । नको रे कृष्णा रंग फेकूं चुनडी भिजतां । माळीवरच्या पिंजऱ्यात राघू बोलता । केगदीच्या वनी गे नारी साप डुलीता । माळावरच्या पिंजऱ्यात राघू बोलता राधाकृष्ण परस्परी रंग खेळता । नको रे कृष्णा रंग फेकू चुनडी भिजता

## नऊ

आंब्याक लागले लोळये गे
सोयऱ्यागेर पावले दोरयो
होवये सखया कलावतां नाचतत माटवात
पळसाक लागले लोळये गे
सोयऱ्यागेर पावले दोरयो
होवये सखया कलावतां नाचतत माटवात
ए गे तूं माझे भयणी
नाय तर आसा माझी वयनी

## दहा

ताक चाळते लोणी चाळते सदा गौळणी ।
जोडथा चुडथा लागला लोणी गाई गौळणी ।
आळंवी दाळंवी हया घराला कोण गे बाळ
हया घराला बाई बाळंती
त्या घराला चरवा पडती
हुंबरे[1] दिये जळती
तिचे न्हान ये मोर खेळती.

(१) असाही एक पाठ : झुंबरे

## अकरा

माटवाच्या दारी त्याला तुपाचे डबे ।
मानाचे उभे आमचे बांदेश्वर
माटवाच्या दारी त्याला तुपाचे डबे
मानाचे उभे आमचे गोळवलकर भावोजी
माटवाच्या दारी त्याला तुपाचे डबे
मानाचे उभे आमचे पारकर भावोजी.

## बारा

हौस मला मोठी, आयाऊ[1] मरणाची
येऊन चुडे राजा, नको हलवू माझ्या राजा
माझ्या बाजाच्या करी साजा
नवलक्षाचा पितांबर, फाटूनी वाती करी
दिवा पिटता मंदिरात
थयसून गेली गे सोनारवाड्यात, सोनार तुमी मामा
एवडा मंगळसूत्र दी वेगीना, कोनाची कोण तुझी
पीर्तीची माझी बाजा, निघाली नीर[2] आजा
फुडे नी गाडी गेली, चंदन गे लाकडाची
दुसरी गाडी गेली, काजळ कुंकूमाची ।

(१) अहेव (२) नार

## तेरा

सांगुनिया मिया धाडी
मांय माजे ते पार पार
न्हानाची केली थोर
केली सारखी शिकविली
परया घरा दीली
पाणीयाची दुड
माये माजी ती झाली दुड
माथे मीई ती झाली जड
उतरुनी खाली ठेव

## चौदा

कोनाची सोपे लोटे
आत्मा लागले आपले वाटे
भावाची मिया भयन
आखाडयावर कां ग उभी
दाजी रे बंधू माझा
वाटे वधी माजा चंद्रमाची
दारातले नीघ तुळशी
केसरा जाळू भार

रामारे बंधु माज्ञा
माज्ञा कुटीचा पूणी थोर
साखरेचा रे लाडू
तुपाचे संगतीचा
रामा रे बंधु माज्ञा

## पंधरा

पाऊस घडो घडी
मळ्यातली दिसते हिरवी छाया
माये वाचूनी करी ना माझी माया
अगमीचा ग तोंडा जळत ओलयातील
माये वाचूनी कोन म्हणेना काम केला
दारातले गे केळी वाकडा तुला बाँण[1]
कमळागो बाये माजी चीरी कमाळ त्वांड

(१) बाँड

## सोळा

गुडयार फोडल्या फुटाना फुटाना
मगे मीयां ता घाटनार फोडलय, घाटनार फोडलय,
फुटलाय, फुटलाय
बरा बरा मीया खालय, मीया खालय
वांयट वांयट मीया आड्यात टाकलय
आडयान माका चारो दिलो । चारो दिलो.
चारो मीया गाईक घातलय । गाईक घातलय
गाईन माका श्यान दिल्यान । श्यान दिल्यान
श्यान मीया वायनाक काढलय
वायनान माका कनी कुडो दिलो । कनी कुडो दिलो
कनी कुडो मीया जात्यात टाकलय । जात्यात टाकलय
जात्यान माका पीठ दिल्यान पीठ दिल्यान
पीठ मीया माणीत टाकलय माणीत टाकलय
माणीन माका गुळो दिलो । गुळो मिया कायलीत टाकलय
कायलीन माका वडो दिलो । वडो मिया शिक्यार ठेवलय
शिक्यावरलो खालो राजाच्या बोकल्यान । राजाच्या बोकल्यान
बोकल्यार दोन ढपके मारलय.

# सतरा

हडे जायन तडे जायन
पिकी प्यारा खायन
मामाचे छत्रेक हिरवे गोंडे लायन॥

# अठरा

हा झोपाळ्या बुडी त्या झोपाळ्या बुडी
चिखल चिखल मार्ती, चिखल चिखल मार्ती
ती मार्ती दिलय कुंभाराकडे कुंभाराकडे
कुंभारान माका गाडगी खोली दिली
गाडगी खोली दिली
गाडगी खोली मीया बाईन टाकलय
बाईन टाकलय
बाईन माका पानी दिला
पानी मीया तर्वासिर्नीक घातलय
तर्वासिर्नीन माका तवसा दिला, तवसा दिला
तवसा मीया इकूक नेलय इकूक नेलय
इकू हेलया इकाना इकाना
मग मीया ता गुडयार[1] फोडलय गुडयार फोडलय

(१) गुडघ्यार

टीप : या गीतानंतर गीत सोळा वाचावे.

# एकोणीस

नामदेवाचा गीत

नामियाची गे घरी इला गे दळीदार
नामियाची गे नारीन मारीला काखें सूप
नार हिंडे गे दारो दारी
वाटे गावूला गे देवू ॥ धृ ॥
तीया[१] कोनाची गे कोन आहो[२]
मीया नामियाची नार आहे ॥ १ ॥
देवू थियसून गे मागे परतला
गेला गे आपले घरी ॥ २ ॥
त्याने सांगिला गे आपले नारी
दिर्ये वट्टीयेत गे भरी ॥ ३ ॥
देवा दिर्ये कोना नेता
नामियाची घरी इला गे दळीदार[३] ॥ ४ ॥
देवू चालता नियगे झाला
वाटे गावला निगे वाटसूर ॥ ५ ॥
वाटेच्या वाटसुरा नामिया घार कोटे आयी
आम्याची आमराई पनसाची बागशाई ॥ ६ ॥
तिथे नामिया घार आहाई
देवू नामियाचे घरी गेला ॥ ७ ॥

नामियाचे गे नारी सूप आनी तू ग बाहीर
नामियाचे नारीन सूप आनीला बाहीर ॥ ८ ॥
दिर्य सूपात गे ओतीला
तिना गे विचार केला तुमी कोनाचे कोन हाई ॥ ९ ॥
मीया देवाचे देऊ हायी
आता गया हो भोजनासी ॥ १० ॥
काल आमच्या एकादशी, आज आमच्या दुवादशी
माझ्या अस्तरी गे उपाशी ॥ ११ ॥
(१) तुला (२) आहे (४) दळिदार

## वीस

अंकुळसाई देवू भिवसन हंकाराचे[1]
मातेच्या बोलण्याचे हत्ती आणीले इनराचे[2] ॥ धृ० ॥
हत्त्यावर बसली कोंनी[3] । कोंती गंधरी[4] बना वाटी
गंधरी नाही घरी । घे गे गंधरे माझा वान ॥ १ ॥
कोंती हिंडे गे दारोदारी । गंधरे गर्व भारी
तुझा वान गे मज नको । नाही घेशील माझा वान ॥ २ ॥
तुका पुवेजाचा गे आन ।
शापनी कारन गंधरेन घेतला वान ॥ ३ ॥
(१) अहंकाराचे (२) इंद्राचे (३) कुंती (४) गांधारी

# एकवीस

## विट्ठलाचा गीत

आकाडे एकादशी पोवू चालला पंढरेशी
पोवू म्हणे गे पानी पानी ॥ ध्रु० ॥
दयाळ इट्ठलाने तळा बांधीला चहुकोनी
त्या तळ्याचा नावू कायी ॥ १ ॥
काशी खांडीची गिरजाबाई
गिरजा गे कोनाची । गिरजा गोव्याची ॥ २ ॥
हाती माळा गे पोऊळ्याची
शंबू देवाला गे वाही ॥ ३ ॥
शंबू दिसता गे म्हातारा । गिरजा दिसती गे नवरी
माटवागे दुवारी हसती जन नारी ॥ ४ ॥
शंबूने कायी केला । आंगाला लायी बीबून
आंगा घातला आंगरखा । हाती घेतली ब्यात काटी ॥ ५ ॥
शंबू चालते निगे जाले । शंबू गेले गे सासऱ्याचे घरी
गिरजेन दूर सून गे देखीली ॥ ६ ॥
लायीली माळ्या शीडी । काडील्या साळी दळी
गिरजा धरम करू आली । येक पाय गे बाहेर
ऐक पायगे चितूर ॥ ७ ॥

गिरजा मनी गे चरकली । गिरजा मागे गे परतली
गेली गे बापाच्या बाजेवरी । बाप तू माझ्या होशी ॥ ८ ॥
बाहेर आला जोगी । त्याचा इचार कर वेगी
माजे कपाळाची गे शिरी । असली लेक ही मेल्या बरी ॥ ९ ॥
(१) भितूर

## बावीस

साखरेचा निगे नीवा पचवा तेनी खावा । पहिले गीत गावा
माझ्या माहेरीच्या देवा । माहेरचे देव गे नकळता ।
माझ्या गे काकुळती देव पाषाणी बोलती ॥ ध्रु० ॥
जीवाला माझ्या जड नको ननीचा पाला ।
माझ्या गे माहेरीचा देवू सपनी वेडा झाला ॥
जीवाला माझ्या नाही भगताची चाड ।
माझ्या त्या सासू माऊ बरधी हाई झाड ॥
आली गे वावूझड ।
केळी गे फाटला तुझा पान ॥

मुखीच्या सबदान रामा हटला माझा मान ॥ धृ० ॥

देगा तू देवा मज चुड्या माझ्या त्या चंद्रबाळ ।
हरिया पितांबर नेसूय पायी घोळ ॥ धृ० ॥

काचीचा माझा चुडा गे तो जरीच्या उर्मलात ।
मोरु ज्या गावात चुडा माझा तो बलवंत ॥ धृ० ॥

## तेवीस

आज गे हरताळेकचा दिस । फाल्या गे चवथीचा दिस
पार्वतीन काहीसा केला । काढीले पांच नारळ
फोडीले पांच नारळ । काढीला अप्रस रस
रससा अंगा माखिला । अंगार्चा केली मळण
मळीचा केला बाहुला । पार्वतीन काहीसा केला
पाजीली अमृत कुंपी[1] । थेईला बाळा दरवाजा
पार्वती पानीया गेली । इतक्यार आला गे म्हादेव देव्
म्हादेव देव् गे बोलता झाला । तू बाळा कोणाचा कोण
पार्वती माझी रे माता । म्हादेव माझा रे पिता
म्हादेवाला कोपसा आला । काढीली कमरेची सुरी

मारीली बाळाचे उरी । धडपडला धरणी गे शिर गेला गगनी
पार्वती माता गे पानीयाहून आली । पार्वती रडूं लागली
माझ्या रे बाळाचा वध कोणी केला । न्हय माझो पाप कर्माचे
इतक्यात चालले सार्ठीशी देवू । एक हा देवू गे बोलता झाला
ती कोण रडता ती पाहून येवू या । दुसरा देवू गे बोलता झाला
हार्यी रे भूत ना खात । तिसरा देवू गे बोलता झाला
गेले गे पार्वतीजवळ । तू गे रडते कशाला
माझ्या रे बाळाचा वध कोणी केला । सार्ठीशी देवू गे चालते झाले
गेले गे माळणीच्या मळयांत । मारीला हत्तीचा शिर
बांधिला हाताच्या लेसा । लाईला बाळाच्या धडा
बाळाला साजिवंत केला । बाळाला आशिर्वाद दिला
तू बाळा सर्वात लहान । तुझा रे पहिला मान
(१) कुरी

## चौवीस

सुलोचना पतिवर्ता गे ही कन्या शेषाची । ही कन्या शेषाची
गे दिली होती इंद्रजीता । निकुंबळी पाहुन गे होम
मांडीला दारोडी[1]
लंकेच्या मर्तिने[2] गे होम टाकीला विद्रासूनी गे ।
ह्या होमाची बातमी
गे बिबिशना कळली । इंद्रजीताची लक्ष्मणाची लढाई लागली ।
इंद्रजीताने बाण सोडीले गे । लक्ष्मणाने अळंगीले गे
लक्ष्मणाने बाण सोडीले गे । इंद्रजीताच्या शिरा लागले गे
धडपडला धरणी गे शिर गेला उडोनी ।
शिर गेला उडोनी गे गगनी
पडला गे । सुलोचना पतिवर्ता तुळशी पाणी घालुशी गेली ।
पुरुषाची बाहु जे तिच्या अंगणी पडली । घेतिली लेखणी तिने
घेतीला कागद । पुरुषाचे बाहु जे लिहीली पत्रिका ।
घेतली पत्रिका
तिने मिरीया घातली । सुलोचना पतिवर्ता चालली
मामजीच्या दर्शना

सुलोचना पतिव्रतेचा येना कसा झाला गे ।
काढिली पत्रिका तिने

पुढ्यात टाकली । वाचूनी पाहीली त्याने धरणी वळमीली ।
हरी—हरी

बाळका माझ्या निधाना इंद्रजिता । सुवर्णाची लंका सोडूनी बाळा
का पडला समरंगणांत । सुलोचना पतिव्रता चालली
रामाच्या दर्शना

असा कसा कळेल्या माका । शेषाच्या बाप्पाचा मी आणतय
होतय सैन्य ।

शिर मारतल्या विराचा मी शोधस घेत होतय ।
शिर दिया भाजोनीया

शिर दिया तळोनी । सुलोचना पतिव्रतेन शिर मिरीया घातीला ।
सुलोचना पतिव्रता सती आगीशी रिगली । मी कुंबळी शेषाची ।
तुम्ही गुढी उभी राहा[3] वंषाची । तुम्ही गुढी उभी रहा ।
उभी राहा वंषाची[4]

( १ ) दारूण ( २ ) मारुतीने ( ३ ) उभारा ( ४ ) वंशाची

## पंचवीस

घाणा जी घातीला । खंडीभर भाताचा
मांडव गोताचा । दणका भारी
घाणा जी घातीला । खंडीभर भाताचा
आधी मान देती । कुंकवाला
आधी मान देती । हळदीला.

## सव्वीस

माळाच्या माळसेणी[1] । गंगेचे जाय पाणी
पाणी तापीव भैणी । नवरीच्या
आमची नवरी । गिंडीन पाणी न्हाई
सारंग लोट्टु जाई । केळी वना.

( १ ) माळशेणी

# सत्तावीस

गुंड्यान बांधला तळा । राखेन बांधला तळा
त्यात पान येल । रुजू घातली
एक पान पानवेली । दोन पानं झाली
दोन पानं पानवेली । बी खबली[1]
दोन पानं पानवेली । तीन पानं झाली
तीन पानं पानवेली । कुडी फुटली
तीन पानं पानवेली । चार पानं झाली
चार पानं पानवेली । वेल चढली
चार पानं पानवेली । पाच पानं झाली
पाच पानं पानवेली । फळं लागली
पाच पानं पानवेली । सहा पानं झाली
सहा पानं पानवेली । फळ कुंबटी झाली
सहा पानं पानवेली । सात पानं झाली
सात पानं पानवेली । फळ सोकावली.

(१) रुजली

## अठ्ठावीस

साडे सोळा[1] गहू दळा ॥ साडे सोळा गहू दळा
बढाण[2] भर गे भागडणी[3] । नवरीच्या भेणी सुगडीनी[4]
त्या बढणांत[5] काय काय परी
भात भरला शिगोशिगी-पापड लावले हारोहारी
सांडगे लावले परोपरी-तूप ओतलं धारोधारी
त्यांत खोबऱ्याची वाटी-त्यावर नवरंगी सूप
त्यावर चोळीचा खण-त्यावर पानाचा विडा
त्यावर नवलाक दिवा-घे गा नवऱ्या नवरीचं नांव
घेगे नवरी नवऱ्याचं नांव-उघड बढाण दोघे जेऊ.

(१) सोडा (२) वाढण (३) भागेलणी (४) सुगरणी (५) वाढणात

# एक

येवं येवं कुऱ्या मोगरया मोगरया
सोमो पळालो डोंगरया डोंगरया
डोंगरी मांगरी जायचे कळे जायचे कळे
जायचं कळं डोंगरया डोंगरया
उठ गा मामा कैवाऱ्या कैवाऱ्या
मामी जाता मायेरा मायेरा
जाता तीतकी जावंन जावंन
न्हय ऐलाडी पावन ये पावन ये
न्हयक आला लोणा[1] लोणा
भिजला ग मामी तुझा गोणा[2] गोणा
गॉण्याक होती एक काडी काडी
काडयेक होता एक रुपया रुपया
रुपायाची गोळी खडपा फोडी
खडपाक होती एक आबोली आबोली
आबोली चिबोली न्हायाला न्हायाला
शेर शेर गोणं खायाला खायाला
शेर शेर गोणे कागाचे कागाचे
भावस माजे रागाचे रागाचे

राक[3] करुन जामळीर बसतले बसतले
भटाचे घाळीक थुकत जातले थुकत जातले
गोरेले भयनीक हाडूक जातले हाडूक जातले
गोरेले भयनीक चुड्या पेड्यानी चुड्या पेड्यानी
तीयाँ[4] तरी ये रे हतीघोडयानी हतीघोडयानी
हत्ती घोडे साऊळे साऊळे
माणयेर दुमके मोतयाचे मोतयाचे
मोती कसा लीव बाये झ्याप कशी घेंव
तुळशीचे पेडयेर[5] पाय कसो थेंव
उब्याती फुगडी घालवाना घालवाना
म्हातारेचे कोणींत घालून घेंव.

( १ ) लोंढा ( २ ) गोंडा ( ३ ) राग ( ४ ) तुयां ( ५ ) पेळयेर

## दोन

ढोलीत कवडो यियालो यियालो
गावचो गावडो भियालो भियालो
गावच्या गावडयाचा नांव काय? नांव काय?
रागोबा । रागोबा
रागोबा वीगोबा झीरीमिरी पाटयों
झीरी मिरी पाटयों

चडवाक दिला घाटांर घाटांर
वगलय गो चेडवा देवाच्यो हारी
देवाच्यो हारी

दयावाक देव वाये भ्याटाना भ्याटाना
कलम्या[1] कापाड न्हासाना न्हासाना
कलम्या[2] कापडाची एकच मीरी[2] एकच मीरी
लाय गो वोंचारडया कुकमाची चीरी
कुकमाची चीरी

कुकमाचे निर्रायेक वागदोळे वागदोळे
आता गे वाये काय करूं काय करूं
खामल्या दयावाचे पाय धरूं पाय धरूं
खामल्या दयावाचे पाय धरूं पाय धरूं
खामलया दयावाच्यो गुजूल्यो गुजूल्यो
दयाळया पानयांत खुजूल्यो खुजूल्यो
दयाळां पानी हंयखंयचा हंयखंयचा
न्हयचं घाळीचां घाळीचां
न्हय कुटे[3] गेली न्हय कुटे गेली
वाऱ्यान झोकीली वारा कुटे गेला.
न्हयचे पयलाडी न्हयचे पयलाडी.

( १ ) तलम्या ( २ ) नीरी ( ३ ) खंय

## तीन

हे भिती ते भिती माजार हगलां भिती

माजार हगलां भिती भिती

शाजारनीचां कुत्रां इलां तेनी धरल्यान दाती

तेनी धरल्यान दाती

तेचे दातीक ख्याटला ख्याटला

मामाचा तुबाक प्याटला प्याटला

मामाच्या तुबकाक आकीतयो आकीतयो

घाल रे आम्या बेबेस्रु बेबेस्रु

बेबेस्रु जाल्या राकांचा राकांचा

राकतां पांकतां इयालां इयालां

इयाला जाल्या खरवच[1] खावचो

खरवच खावचो

खरवच खाता खाता दाडयो पाचेल्यो

दाडयो पाचेल्यो

दाडयो पाचेल्यो जाल्या शाळेंत जांवचा
शाळेंत जांवचा

शाळेंतला इमना[2] पळाला पळाला
लेंस घेऊन वाये मिळाला मिळाला
भ्याळा नाळा ताकाला ताकाला
वामनीचां मोडलां दोकाला दोकाला
वामनीच्या वोडक्याक त्याल कोड्ड
त्याल कोड्ड

वामनीक जाला झील चेड्ड
तां वाये चेड्ड आम्पाचा आम्पाचा
निसत्याक मागता काम्पाचा काम्पाचा
तां वाये चेड्ड पनसाचा पनसाचा
निसत्याक मांगता घनसाचा घनसाचा.

( १ ) नरवस ( २ ) इमला ( विमला )

## चार

इस तीस कोमडी चरत जायत

चरत जायत

इस तीस काँमडयाचो घाला घाला माळो

घाला घाला माळो

व्हाळाग रे दादा तुजे पाडे तुजे पाडे

तुजे पाडे धवळया शिंगाचे धवळया शिंगाचे

बैल कुटे गेला बैल कुटे गेला,

मॉरया शिंगाचे मॉरया शिंगाचे

बाळो येयत तर माजो मारुन जायत

मारुन जायत

तिकलो येयत तर माजो मारुन जायत

मारुन जायत.

## पाच

आदाळया पादाळया खंय रे जातय
खंय रे जातय
जातंय जातंय दर्यांगाक दर्यांगाक
दर्यांग रे किल्या दर्यांग रे किल्या
खोपटी बानाक खोपटी बानाक
खोपटी रे किल्या खोपटी रे किल्या
रकयेक रकयेक
रका रे किल्या रका रे किल्या
उसलाक घाल्क उसलाक घाल्क
उशील रे खंय उशील रे खंय
कोल्यानी खाले कोल्यानी खाले
कोले रे खंय कोले रे खंय
चिंचचे डोलीत चिंचचे डोलीत
चिंच फुलली आमो दूलली
घेरे आम्या गॉलाटा गॉलाटा
पयलांच गॉलाट कॉनाचा कॉनाचा
नेहरु[1] सारख्या रायांचा रायांचा.

(१) नेरु

## सहा

माज्या अंगीची खणचोळी गे माज्या
अंगीची खणचोळी
विंचू चावला चौघडी गे
विंचू चावला चौघडी
कळा पोचली मनगटी गे विंचू
नव्हे ता सरप
गे विंचू नव्हे ता सरप
वैज[1] बोलवा हो श्रीकृष्णा पंडरेचा राया
गे विंचू नव्हे ता सरप.

(१) वैद्य

## सात

दुदुरली कुर्ली दुदुरली कुर्ली
दूदला पानी न्हाये न्हाये
दूदला पानी न्हाये न्हाये
न्हेरु आमचो लगीन न्हाये
लगीन न्हाये

लगीन न्हांता न्हांता बायल जाली थोर
बायल झाली थोर
बायल पळाली सातोड्यांक,
सातोड्यांक
नवरो पळालो न्यातोडयांक
न्यातोडयांक.

## आठ

शेताचे मेरेक शेताचे मेरेक कोको इयालो
कोको इयालो
कोंकयान वरनी धयाडां केली
न्हेरू भियालो न्हेरू भियालो
न्हेरू तीया[1] भिया नको
देवळापुढे जा देवळापुढे जा
देवाळापाटी देवळापाटी धुकट सो रेकता
धुकट सो रेकता
गांजील आमचो गांजील आमचो
खांवक सो मागता खांवक सो मागता
लाडू दिल्या थागाना थागाना
केळी दिल्या थागलो थागलो उडयाचो
म्हनी काढून खापायलो खापायलो

(१) तुवा

## नऊ

पाटल्या दारा फुडल्या दारा जिरा उंपला
जिरा उंपला
कित्या गो जीऱ्या उंपलय उंपेलय
गोरवां न्हयगो चिरडतत
गोरवां न्हयगो चिरडतत
कित्यागो गोरवानू चिरडतात चिरडतात
राकनु राकांना राकनु राकांना
कित्या रे राकन्या राकानें राकानें
धनीन जेवक घालीना धनीन जेवक घालीना
कित्या गे धननी जेवक घालीनय
जेवक घालीनय
कांटी खोलो हार्डीना कांटी खोलो हार्डीना
कित्या रे राकन्या कांटी खोलो हार्डीनय
कांटी खोलो हार्डीनय
पाळ कोयतो देयना पाळ कोयतो देयना
पाळ कोयतो सुताराचे साळेत
सुताराचे साळेत
सुताराचे शाळेतलां इमना[1] पळाला पळाला
लेस घेवन बाये म्याळाला म्याळाला.

(१) इमला (विमला)

## दहा

केळीच्या गवटा, केळीच्या गवटा
नांव माजा पलटा नांव माजा पलटा
पलट माजो थाटाचो थाटाचो
दादा तुजो रुमल गे चिटांचो चिटांचो

## अकरा

धोपट कुमया वयलां रान वयलां रान
वयल्या रानांत त्यारा भाजी खूप
त्यारा भाजी खूप
येगे म्हारनी जागे म्हारनी त्यारा कूटीत[1] जा
त्यारा कूटीत जा
त्यारा पडली खनीत खनीत
हगा गे म्हारनीच्या तोणीत[3] तोणीत
म्हारीन गेली रागान रागान
थेयम्सर धरली तीका वागान वागान
असलो कसलो वाग गे वाग गे
गुळ्या यादया[2] डॉळयांचो डॉळयांचो
सुपा यादया कानाचो कानाचो.

( १ ) खुटीत ( २ ) येवा ( ३ ) टोणीत

## बारा

कवात्यान कवातो पालेलो पालेलो
मामा जाय जीवनाक[1] तो तानेलो तानलो
हाडगे मामी गीडग्यानी पानी पानी
यायाक गीडग्या कितक्याचा कितक्याचा
मामा सांगता रुपयाचा रुपयाचा
मामी सांगता पैशाचा पैशाचा
रुपयो जालो खोटो खोटो
मामाक झील जालो मोटो मोटो.

(१) जेवनाक

## तेरा

चीचेवयल्या चीचेवयल्या लाल्का गो
लाल्का गो
झोप काय गो घेतहय्
झोप काय गो घेतहय्
होय बायेला होय बायेला
व्हाँराक न्हय गो इलेहत
व्हाँराक न्हय गो इलेहत
कोन कोन इलेहत कोन इलेहत
सासू मांऊ इलेहत सासू माऊ इलेहत

काय काय हाडल्यानी
काय काय हाडल्यानी
साडी चोळी हाडल्यानी साडी चोळी
हाडल्यानी
सासये माया वांगडा जावचय नाय
जावचय नाय
चीन्चयल्या चीन्चयल्या लाल्का गो
लाल्का गो
व्हांगाक न्हय गो इलेहत व्हांगाक न्हय गो इलेहत
कोन कोन इलेहत कोन कोन इलेहत
दिर जाय इलीहा दिर जाव इलीहा
काय काय हाडलां हां काय काय हाडलां हा
केळी खोबरी हाडली ही केळी खोबरी हाडली
दिरा जाये वांगडा जावचय नाय जावचय नाय
व्हांगाक न्हय गो इलेहत व्हांगाक न्हय गो इलेहत
कोन कोन इलेहत कोन कोन इलेहत
घोव इलोहा चाबूक काटी हाडल्याहान
चाबूक काटी घेनलंय घेनलंय
घोवावांगडा जातलंय जातलंय.

## चौदा

डोण्यार पाकरुं झोप घ्याता

झोप घ्याता

घ्याता तीतको येवने येवने

मामाक सांजे आमच्या येवने

येवने

मामाचे माणयेर[1] बसतलय बसतलय.

मामीच्यो चाडयों सांगतलय

सांगतलय

मामीक मारुक लायतलय

लायतलय.

(१) मांडयेर

# पंधरा

## लग्नाच्या ओव्या

माटवाचे दारी, माटवाचे दारी
गांटा पीवळा घेऊनीया
 गांटा पीवळा घेऊनीयां
बाई सरा भाईर ॥ धृ ॥
रुक्मीण पावली माटवादारीं
रुक्मीण पावली माटवादारीं
माटवाच्यो परी देकून
 माटवाच्यो परी देकून
मनी रुक्मीण संतोसली ॥ १ ॥
रुक्मीण पावली लोट्यादारी
रुक्मीण पावली लोट्यादारी
लोट्याच्यो परी देकून लोट्याच्यो परी देकून
मनी रुक्मीण संतोसली ॥ २ ॥

रुक्मीण पावली वळयदारीं
वळईच्यो परी देकून वळईच्यो परी देकून
मनी रुक्मीण संतोसली ॥ ३ ॥
रुक्मीण पावली कान्नी दारी
कान्नीयोच्यो परी देकून कान्नीयोच्यो परी देकून
मनी रुक्मीण संतोसली ॥ ४ ॥
गायतरेचां श्यान गायतरेचां श्यान
घरतरी सारवान घरतरी सारवान
त्यावर घातीला कस्तुर कन
त्यावर थेईलो चंदन पाट
त्यावर थेईलो ताम्या तामयो
त्यावर घेईला अमृतफाळ
काजीन ही पूजा पात्र जानी
कान्नी गे रुक्मीणी कान्नी गे रुक्मीणी
कान्नी गावला नवलक्षहार, कान्नी गावला नवलक्षहार
तो दीलो सासयेपाशी, तो दिलो सासयेपाशी
सासू म्हणता सूनेपाशी
सूनी घाल आपल्या गळ्यापाशी.

## सोळा

हाडीली जाती गे मांडिली रंगा
दयावयाळ्या देऊरंबा येऊं सांगा
दयावाळ्यो देवरंबा येतय हूनती
त्याना जां लेईती बाळये बुगड्या.

## सतरा

परान पती

नदीच्या पलिकडे काय बापा गर्जना
नदीच्या पलिकडे काय बापा गर्जना
लेकी तूजा परानपती सैवार न्हाऊंक यातां
लेकी तूजा परानपती सैवार न्हाऊंक यातां.

अठरा

यजमान

फोडीले नारळ गे केली पाच वळी

नितकाऱ्याच्या चे वळीं कार्य

आकारीलां

कार्य आकारीलां गे ऱ्यान्त्या

याजमान्यानी

जान्त्या कूळकरानी कार्य

संपादीला

यजमानीन

वाटेवयले काजीची सुकली सीरपूटा

दिसती बरकूटा याजमान्यांचीं

पाटल्या दाराच्या पनसार सुकली सीरपूटां

निचाकली बरकूटां याजमान्नीची.

## एकोणीस

माटव शीवलो गे पनसाच्या दावांनी
न्हावऱ्याच्या भावानी माटवा परी केल्यो
माटव शीवलो गे माडाच्या चुडत्यानी
न्हावऱ्याच्या चुलत्यांनी माटवा परी केल्यो
माटव शीवलो गे माडाच्या हिरानी
होकलेच्या दिरांनी माटवा परी केल्यो.

## वीस

जात्यावरील ओव्या

दुडूनी वर दुडनार चालली झडकुनी
कलमा वृक्षाखाली कृष्णा राहिले दडूनीया
सोड सोड कृष्णा माजी वाट
दह्या दुधाचा जाला नास
मला जाऊ ने मतुरेक
गौळण ताक चाळी कृष्णान धरली
राई[1] दोरी
सोड कृष्णा राई दोरी तुला खायाला
देते तोरी[2]

कृष्णान धरल्या दोनी मुटी
सोड कृष्णा मुटी तुला खायला देते दूद भात
तळपत्या गे तळ्यावरी
जशी भटाची गे मुली
जशी चीमुवानी[3] पानी काडी
माई माऊंचां ताट भरी
साऊळा माजा बंधु
दारी फूलले गे लवंग
लवंगीयाचा घोस
माज्या मामानी दीला लेस
जसा दिललाची[4] तरंगी.

(१) खी (२) तीर (कैरी) (३) चिमुल्यानी (४) दिल्लाचा तो रंग

## एकवीस

दरीयाची गे लाटा
लाटा येतील तशी जातील
शंकर पारभती दोघाय्
जोड्यान तीरथ न्हाती
परतली पारबती
साईल्याची गे पांना

पाना न्हेसली धूरपती
पांच त्या पांडवांची
जशी एकवीस कौरवांची
लज्जा गेली ती दूनीयेशी
लज्जा गेली ती दूनीयेशी.

## बाव्वीस

बान्याच्या[1] गे बाजारात
दिर माजा ता साऊकार
दिर माजा ता साऊकार
जाऊ बाईला केरी हार
सासूबाईला चिंचपटी
सासूबाईला चिंचपटी
ननान रुसली मोतियांसाठी
सांगे मीनी गे शान्या दिरा
आपले भयनीची समजूत करा
आपले भयनीची समजूत करा
मोतयां पोऊळयांनी घोटी भरा
तिकां घराक तीच्या पोचनी करा.
तिकां घराक तीच्या पोचनी करा.

(१) बायाच्या

## तेव्वीस

यशोदेचे गे दारी
दारी पिंपळाच्या गे आळी
पक्षी बोलेता नाना परी
पक्षी बोलेता नाना परी
पक्षी उडूनीयां गेला
पंखा लागल्या गगनाशीं
रामा नी लक्ष्मीन दोगे गेलेसे लगनाशी
सीतेचा गे माळाप
लऊ गे आटीयेचा
सीता उबी राही ती बंदरा
माळा वाई ती रामचंद्रा
कौसूंली तीची सासू
सासू देईना पानया दूड
रामाच्या गे सतवानी
पानी हाडीता चिमुवांनी'
सीता बावडी वनीयेशी
कौसूंली तीची सासू

सासू देईना काणूं[1] मूसाळ
रामाच्या गे सतवानी
सीता काणीता कोपरानी
कौसूंली तीची सासु
सासू देईना काणूं[3] जाता
रामाच्या गे सतवानी
सीता दळीता तळातूत्रानी
सीता बावडी[4] वनीयेशी
रामाच्या गे कुंडावरी
जैसा धोतराचा गे पीळ
मेळ चालला लव अंकुसाचा
रामाच्या गे कुंडावरी
धोतराची गे घडी
जोडी चालली लव अंकुसाची ॥ रामाच्या गे कुंडावरी
हीरई पालकी गे कोनाची
रामाची गे जानकी ॥ चालली आंघोळेशी.

(१) चिमुल्यानी ( चिमली लहान तांब्या ) (२) कांडू (३) दळू (४) बापडी

# चौव्वीस

आयलाडी कनकी पयलाडी कनकी
मर्दी बाये जानकी पीटो कार्णी पीटो कार्णी
पीटो काणून उण्डे वळी उण्डे वळी
उण्डे वळून शिक्यावर थेयले
शिक्यावर थेयले
शिक्यावयले शिक्यावयले
बोकल्यान हेले[1] बोकल्यान हेले
बोकल्यार मीयां ढूमको मारलो
ढूमको[2] मारलो
ढूमको माजो रायाक पावलो
रायाक पावलो
रायान माकां हत्ती घोडो दिलो
हत्ती घोडो मियां बाया भावनीक दिलो
बाया भावनीक दिलो
बाया भावनीन माकां काजाळ कुकूम दिला
काजाळ कुकूम दिला
काजाळ कुकूम मीयां रुमडाक फुसला
रुमडाक फुसला.

रुमडान माकां रुमड दिलो

रुमड दिलो.

रुमड मीयां गनगेत टाकलो

गनगेत[3] टाकलो

गनगेन माका मासो दिलो

मासो दिलो

मासो मीयां वयच्या खुटार थेयलो

वयच्या खुटार थेयलो

वयच्या खुटावयलो घारीन हेलो

घारीन हेलो

घारी घारी माजो मासो दी

मासो दी

नायतर तुजां पाक दी

पाक दी

पाक तुजां वायटोळां वायटोळां

वायटोळा चियटोळां म्याळवाने

म्याळवाने

गनंगतल्या वाबूक रव्याळवाने

रव्याळवाने.

(१) नोंले (२) धुवको (३) गंगेत

## पंचवीस

दारुस्ते बयल्या दारुस्ते बयल्या
बावल्यानु गो बावल्यानु गो
कॉनाची वाट तुमी बगताशी गो
बगताशी गो
बघतय् बघतय माज्या दादाची वाट
दादाची
तुजो दादा माझो दादा याताहा
याताहा
तळयेंत हातपाय धृताहा धृताहा
द्यावाची पूजा करताहा करताहा
द्यावाक नाल बाये फोडताहा
फोडताहा
सगळ्या पॉरांक वाटताहा वाटताहा.

[ दादा या शब्दासारखाच ' मामा ' हा शब्द घालून सुद्धा हे गीत म्हटले जाते. ]

# सव्वीस

माज्या झोपाळ्यावूडी तुज्या झोपाळ्यावूडी
चिकन चिकन माती चिकन चिकन माती
ती दीली मियां कुमाराचे हार्ती
कुमाराचे हार्ती
कुमारान दिली माकां गाडगी गोली
गाडगी गोली
गाडगी गोली मियां बायच्या कांटार थेयली
बायच्या कांटार थेयली
बायन माकां पानी दिलां पानी दिलां
पानी मियां तवशीनीक शीपलां
तवशीनीक शीपलां
तवशीनीन माकां तवसा दिलां तवसा दिलां
तवसा मियां गवानीर फोडलां गवानीर फोडलां
गवानीन माकां गवात दिला गवात दिला
गवात मिया बैलाक घातलां बैलाक घातलां

बैलान माकां शान दिलां शान दिलां
शान मियां व्हायाँनाक काडला
व्हायाँनाक काडलां
व्हायाँनान माकां कनयूं दिल्यो कनयूं दिल्यो
कनयूं मियां काळे कोमडेक घातल्यो
काळे कोमडेक घातल्यो
काळे कोमडेन माकां कवाट दिलां कवाट दिलां
कवाट मियां आकूकडे दिलां आकूकडे दिलां
आकून केल्यान डवलोभर डवलोभर
घॉवाक घातल्यान तवलोभर तवलोभर
आमका घातल्यान शीपीशीपी शीपीशीपी
आपून खाल्यान मडक्यो खरवडून
मडक्यो गेल्यो धडधाडान धडधाडान
आकू गेलां फडफाडान फडफाडान
घोव गेलो मडबानान मडबानान.

# भाग १ ला

## कोकणी शब्दकोश — शब्दार्थ — वगैरे

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| २ | २ | **माणीत** | पीठ मीयां **माणीत** टाकलंय | माग–मांड–ही लाकडी भांडी. माणीला **कोळंबी** असेही म्हणतात. कोकणातील अंतर्भागात माग, मांड, कोळंबी, वाळमांड ह्या नावाने ओळखली जाणारी लाकडी भांडी आजही दिसून येतात. भाकरी भाजण्यापूर्वी तिला गोलाकार देण्यासाठी अगोदर पीठ मळून त्याचा गोळा करावयाचा तो माणीत (मांडीत) पीठ मळूनच करावा लागतो. पूर्वी तो गोळा दोन्ही हातानी थोपटून (टाळ्या वाजवितांना दोन्ही तळहात एकमेकावर आपटतात त्या-प्रमाणे (मध्ये पिठाचा गोळा घेऊन) भाकरीला आकार देण्याची पद्धत होती. त्यानंतर **माणीत** (कोळंबीत) पीठ मळून त्यांतच त्या गोळ्याची उजव्या तळहाताने थोपटून भाकरी करावयाची प्रथा झाली. आजही भाकरी ह्या प्रमाणेच तयार केली जाते. |
| ३ | ३ | **मोगरया** | येव् येव् कुत्र्या **मोगरया** | मूळचा शद्ब मोगऱ्या (हे संबोधन आहे). कोकणात बैल, कुत्रा, यांना मोरो, कोलो, मोगरो टिकलो, अशी नावे आहेत. "येव् येऽव् " हा शद्बप्रयोग कुत्र्याला बोलावण्यासाठी अद्या-पीही कोकणात वापरला जातो. त्याचा अर्थ 'ये ये' असाच आहे. येव् येव् कुत्र्या **मोगरया**–म्हणजे 'मोगऱ्या (कुत्र्या) इकडे ये' असा घ्यावयाचा आहे. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| ३ | ३ | आंगरी | **आंगरी** मांगरी जायचे कळे | **आंगर**–मूळशद्व 'आगर' जसे भाताचे मिठाचे आगर. त्यापुढचा शद्व मांगरी असा आहे. मांगर म्हणजे कोकणातील शेतघर. त्या मांगरी शद्वापूर्वी आगरी ऐवजी (नादमाधुर्यासाठी) आंगरी शद्व वापरला आहे. (भाताच्या) शेतात आणि मांगराच्या आवारात सगळीकडे 'जाई'चे कळे (कळया) दिसताहेत. सगळीकडे जाईला बहर आला आहे असा अर्थ. |
| ३ | ३ | गोंडो | भिजलो मामीचो **गोंडो** | कोकणात एकेकाळी स्त्रियांच्या वापरात सर्रास असणाऱ्या लुगड्याचा एक प्रकार असा होता की त्या (९ वारी) लुगड्याच्या पदराला जाळीदार गोंडे असत.<br>ह्या गीतातील मामी नदीतून पलीकडे जात असताना डोईवरून घेतलेल्या पदराच्या शेवटी असलेले गोंडे पाण्याने भिजले म्हणजे जवळ जवळ अर्धा देह पाण्यात भिजला असा ध्वन्यर्थ. ह्या ओळीच्या पुढे असलेली 'गोंड्यात होती साडी' ही ओळ चुकीची वाटते. मूळची ओळ "गोंड्याची होती साडी। साडीत होता रुपाया" अशी आहे. |
| ३ | ३ | नायाला | आवोली बुडली **नायाला** | नायाला म्हणजे न्हायाला. आंघोळ करण्यासाठी. आवोलीने आंघोळ करण्यासाठी नदीच्या पाण्यात बुडी मारली. |
| ३ | ३ | केकेत | **केकेत** 'धोंडे' खोयाला | खरी ओळ 'केकेत गोंडे खोयाला' अशी आहे. केकेत म्हणजे त्या काळच्या स्त्रियांच्या केशभूषेच्या प्रकारानुसार खोप्यात. ह्या खोप्याला कोकणीत 'केक' म्हणतात. त्या शब्दाची सप्तमी केकेत (धोंडे नव्हे) गोंडे खोयाला असा अर्थ म्हणजेच त्या केशकलापामध्ये गोंडे (फुले) खोवण्यासाठी–माळण्यासाठी. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| २ | ३ | कागाचे | केकतले गोंड कागाचे नव्हे **कांगाचे** | कांग–एक प्रकारचे धान्य. त्याला कणीस येते. लांब देठावर असणारे कांगाचे कणीस फुलासारखे सुंदर दिसते. ह्या कांगाच्या धान्यापासून चूनकापासारखे काप ( गुळ घालून ) तयार करतात. त्यांना कांगटोळ्या–खाटोळ्या–म्हणतात. कोकणातल्या मुलींना–स्त्रियांना फुलांचा सोस फार. कच्च्या करवंदांचाही झुबका पानासह त्यांच्या अंबाड्यात दिसतो. तसा कांगाच्या कणसाचा उपयोग फुलासारखा करण्याइतक्या त्या रसिक आहेत. |
| ४ | ४ | पाय | शंकर वाघ्च **पाय** गे | पाय=पाही–बघी. |
| ९ | १० | खोली | कुंभारान माका गाडगी **खोली** दिली | **खोली** :—खरा शब्द 'गोली'. कोकणात मातीच्या भांड्यांना त्यांच्या आकारावरुन आणि उपयोगावरुन वेगवेगळी नावे आहेत. जसे मडके ( मोठे ), मडकी ( लहान ). पाण्याचा साठा करण्यासाठी.<br>घागर–गोली ( यांनाच दूड म्हणतात ) विहीरीवरुन घरी पाणी आणण्यासाठी.<br>सोरं ( मोठी ) सोरकुल ( लहान ). पदार्थ शिजविण्यासाठी मालटी, तवली जेवण घेण्यासाठी.<br>त्यांपैकी 'गोली' ही ( मातीच्या ) घागरीपेक्षा आकाराने लहान. पाण्याची 'दूड' आणतांना माटी घागर कडेवर घ्यावयाची आणि लहान असलेली गोली हातात घ्यावयाची. त्यातही पुन्हा प्रथा आहेच. घागर डाव्या कडेवर घ्यावयाची व गोली उजव्या हाती घ्यावयाची असा शिरस्ता आहे. घागर उजव्या कडेवर आणि गोली डाव्या |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | | | हातात घेणाऱ्या स्त्रीला 'मुक्ती' मिळत नाही अशी भीती घातलेली. याच्या मुळाशी गेले की यातील गोम लक्षात येते व अशी भीती स्त्रियांना घालणाऱ्यांच्या बुद्धीचे कौतुक करावेसे वाटते. कारण विहिरीवर वा पाणवठ्यावर पाण्याने भरुन घेतलेली ही दोन्ही भांडी उचलताना, समजा घागर उजव्या कडेवर घ्यावयाची आहे तर ती डाव्या हाताने उचलावी लागेल आणि मगच ती उजव्या कडेवर घेता येईल. आता उजवा हात कडेवरची घागर सावरण्यात गुंतलेला असताना गोली उचलावयाची आहे. ती गोली सुद्धा डाव्या हातानेच उचलावी लागेल. म्हणजे दोन्ही भांड्यात डावा हातच बुडवावा लागेल. आणि डावा हात भांड्यात बुडविणे चुकीचे किंबहुना ओंगळही वाटते म्हणून 'मुक्ती मिळत नाही' अशी भीती.<br><br>"कुंभारान माका घागर खोली दिली" ह्या ऐवजी 'कुंभारान माका घागर गोली दिली' अशी ओळ हवी. |
| ९ | १० | जोयलय | गाडगी गोली मीयां वाईत जोयलय | जोयलयच्या ऐवजी मोडलंय असा अर्थ घ्यावा लागेल. कदाचित जोयलय म्हणजेच मोडलंय असेही असेल. |
| ९ | १० | डवरोभर | | डवरो–डवरो. डवरोभर. डवऱ्यात पाणी ओतल्यासारखी अवस्था त्यालाच 'डबरवनी' असे म्हणतात. डबरोभर म्हणजे खूप पुष्कळ. त्या अंट्याचे 'कालवण' मामीने खूपसे केले. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| ९ | १० | | टवलोभर | तवली–मातीचे तव्याच्या आकाराचे मोठसर असे लहान भांडे. तवलो–टवलो–तवलीचे मोठे रूप त्या टवल्यासारखेच. मालटी नावाचे मातीचे भांडे असावयाचे. |
| ११ | १२ | म्हनी | **म्हनी**—पानी देतलय. | म्हनी = गरीब माणसाच्या घरी बसण्यासाठी वापरली जाणारी पाट वजा फळी. फळकूट. म्हनी–पानी म्हणजे पाटपाणी. आदर करणे, स्वागत करणे ह्या अर्थी. म्हनीचा हा अर्थ स्पष्ट करणारा एक शब्दप्रयोग कोकणात प्रचारात आहे. "मी कोणाचाही मिंधा नाही" असे मालवणी माणसाला सांगावयाचे झाल्यास तो म्हणतो, "मी कोणाचो बशयालो नाय आसय. कोणाच्या '**पादल्ल्या म्हनयेर**' कधी बसाक नाय आसय्." पादल्ल्या म्हनयेर म्हणजे ज्या पाटावर दुसरा कोणी यापूर्वी बसला असेल त्या पाटावर असा अर्थ ध्वनित करावयाचा असतो. |
| १३ | १४ | मानायांक | कडी घातली मी ती **मानायांक** | मानायांक म्हणजे शेतकामासाठी ठेवलेल्या नोकरांना. मानाये म्हणजे नोकरगडी–गोरखमी. गडी–मानाये असे जोड शब्द नोकर माणसांसाठी कोकणात वापरतात. |
| १७ | १९ | निगे | काळी **निगे** चंद्रकळा | नि गे म्हणजे न्हय गे. पण खरे म्हणजे निगे हा शब्द मालवणी गीतांमध्ये अनेक वेळा वापरण्यात आलेला आहे. संत कवींच्या ओवी अभंगामध्ये 'पै' हा शब्द जसा अक्षर शब्द वा मात्रापूर्तीसाठी वापरलेला आढळतो तसाच नि गे चा प्रकार. ह्याचे प्रत्यंतर म्हणजे—ह्याच गीतात आणखीही एक ओळ तशीच आहे. त्यातील निगेचा अर्थ वरील–प्रमाणेच घ्यावयाचा आहे.<br>'**पावसानी** निगे **लागे**' |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| २२ | २८ | दुरू | राशीत<br>गावाला **दूरु** | (१) दुरु म्हणजे दुर्वा. **हरयाळी.** शेरु भरणे–ओटी भरणे (देवीची)<br>(२) दुरु—दुड्ड. दुड्ड हे एक नाणे (एक पैसा). ओटीचा शेशेचा संबंध असल्याने दुड्ड याचा अर्थ 'नाणे' हाच अधिक बरोबर वाटतो. ह्या खेरीज दुड्ड शब्दाला धन, संपत्ती, ऐवज, मिळकत असाही अर्थ आहे. |

# भाग २ रा

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| २७ | १ | शकुशाला | शकुशाला नेसली गनोबाची माया | गणपती ही माया शंकराला वेढून राहिलेली असा संकेतार्थ. |
| ३७ | ८ | गावसरी | धाकट्या दीराला गावसरी | मूळची ओळ 'धाकट्या दिराला गवसली हो गवसली।' अशी आहे. गवसली म्हणजे मिळाली, सापडली असा अर्थ. |
| ५२ | २३ | गुल्लाराच्या | आमच्या भीती गुल्लाराच्या | गुल्लाराच्या. गिलावा करून नितळ केलेल्या ( ओबड धोबड, सांद, फट नसलेल्या अशा. ) |
| ५५ | २४ | होशा | अरे, दादा माझ्या होशा | होशा-आवडता, आवडीच्या, जिवाच्या, जिव्हाळ्याच्या. |
| ५४ | २४ | निमणी | एका ग नगरीचा निमणी राजा | हा 'निमणी' शब्द राजाचे विशेषण म्हणून बऱ्याच गीतांत आलेला आढळतो. आटपाट नगर, साठा उत्तरांची कहाणी, या शब्दांप्रमाणेच 'निमणी' ह्या शब्दाला योग्य असा अर्थ नाही. रुढार्थाने त्याला 'मोठा प्रसिद्ध' असा अर्थ घ्यावा लागतो. |
| ५७ | २६ | भेतळी | काढिले चंदन भेतळी | चंदनाचे लाकूड फोडावयास सरळ. कुऱ्हाडीने याचे बारीक सरळ असे 'भेतळे' करता येतात. अशा प्रकारचे बारीक सरळ असे भेतळे ( फोडीव लाकूड ). |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| ५७ | २६ | तांब्यांच्या | साकटील्या तांब्यांच्या चुली | रात्री स्वयंपाकाचे काम झाल्यावर चुलीच्या राखेत एखादा गोवरीचा तुकडा घालून ठेवायचा आणि पहाटे 'जिवंत' असलेल्या निखाऱ्यावर पुन्हा गोवऱ्या, लाकडाच्या बारीक छिलक्या घालून विस्तव प्रज्वलित करायच्या ह्या कृतीला कोकणांत 'आग साकटणे' म्हणतात. चंदनी भेतळे घालून तिने आग साकटत ठेवली एवढाच अर्थ. 'तांब्यांच्या' हा शब्द चुकीने पडलेला आहे. |
| ५७ | २६ | गजनी | घेतली **गजनी** चोळी | कोकणी गीतांमध्ये 'गजनी' 'मदनी' अशी नावे चोळ्यांना दिलेली आढळतात. तत्कालीन रुढी वा चालीरीतीप्रमाणे चोळीचा हा एक आवडता व प्रसिद्ध प्रकार असावा (जसे इरकली लुकडे, चंद्रकला, पैठणी इ.) |
| ५७ | २६ | नीवळीपेंदा | गेली वा निवळी पेंदा | निवळी पेंद. नदी काठी पाण्याच्या जागी उगवणाऱ्या एकदल वनस्पतीच्या मुळाशी पाळेमुळे यांचा बनलेला झुबका. नदीच्या काठी पाण्यात लव्हाळीसारखे दाट गवत उगवते.<br><br>त्यातूनच पाणी वाहात असते. ते पाणी असे गवताच्या काड्यातून गाळून जात असता त्यातील कचरा, घाण त्या गवताच्या मुळाशी अडकून राहते आणि पाणी (निव्वळ) निर्मळ बनते. असाच एखादा पेंद मधूनच पाण्यावर येतो, बेटासारखा मध्येच उभा राहतो. अशी जागा. त्या जागेवर तिने नवरत्नांचा हार काढून ठेवला असा संदर्भ. |
| ५९ | २७ | अपेली | अपेली नाय तर तपेली आणा | अपेली–तपेली–तपेली एक भांडे, अपेली या शब्दाला अर्थ नाही. अशा प्रकारचे अनेक जोडशब्द मालवणी–कोकणीत आहेत. त्यापैकी एकाला अर्थ असतो. दुसरा पहिल्या शब्दाच्या जोडीला म्हणून उच्चारलेला (निरर्थक) शब्द असतो. जसे भांडा कुंडा, म्हार पोर, इथंन पातेरा, इत्यादी. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ६२ | ३१ | गोता | असे कने सरसवाई गोता जो मांडवा | मूळ शब्द गोता ( गोणता ) असा आहे. कोकणात दळण दळावयाचे झाल्यास जमीन सारवून स्वच्छ करावयाची. अशी नुसती सारवून काढलेली जमीन तशीच ठेवणे अशुभ मानतात. त्यावर रांगोळी काढली की त्या सारवणाला शुभ मानतात. म्हणून सारवणानंतर ( कने ) रांगोळी ही काढावीच लागते. घराच्या भितीना नुसता तांबड्या मातीचा गिलावा करून भित तशीच ठेवणेही अशुभ समजले जाते. त्यावर चुन्यात किंवा कोणत्याही दुसऱ्या रंगात दोरा भिजवून त्या भितीवर उभ्या आडव्या रेघा-दोरा दोन्ही बाजूने ताणून उमटविल्या जातात. आणि त्यानंतर गिलाव्याचे काम पूर्ण झाले असे म्हटले जाते.<br>मग दळण दळावयाचे झाल्यास ( १ ) सारवण, ( २ ) रांगोळी, ( ३ ) जाते कधी नुसत्या जमिनीवर **ठेवीत** नाहीत. प्रथम एखादे स्वच्छ पोते ( गोणता, गोता ) अंथरले जाते आणि त्यावर जाते मांडले जाते. दळण चालू असतांना पीठ जमिनीवर न पडता गोणत्या-वर पडते. त्यात माती रेती जाऊ नये म्हणून ही खबरदारी घेतली जाते. |
| ६३ | ३२ | निपणी | काढिला निपणी रस | ' निपणी ' या शब्दाचा संबंध ' काढीला निपणी रस ' या ओळीच्या अलिकडील ( काढीला कोठारी नाल ) ( नारळ ) ह्या ओळीशी आहे. निपणी रस म्हणजे–एखाद्या फळाचा ( इथे नारळाचा ) पाणी न घालता काढलेला रस. ह्याला कोकणात ' आपरस ' म्हणतात. |
| ६५ | ३४ | जांदा | कापाची सरपोळी **जांदा या** गोंदावली जानया | काप = कानात घालण्याचा एक जुना अलंकार-त्याची साखळी ( सरपोळी ) केसात अडका-वयाची असे.<br>" जानया गोंदावली " यातील गोंदावली म्हणजे गुंतली. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| | | | | इथे पतीपत्नी एकत्र झोपलेली असतांना झालेली 'गंमत' किती सूचकतेने सांगितली आहे ! पत्नीच्या कापाची सरपोळी पतीच्या 'जानव्या' त गुंतली ( गोंदावली ) आहे. त्यामुळे कुणीतरी तिला हाक मारल्याबरोबर त्या अंथरुणावरून तिला लगेच उठता येत नाही ! |
| ६७ | ३६ | ववलक | कांजीत रावला गावला ववलक हार । | कांजीन – विवाहप्रसंगी देवकांच्याजवळ एकावर एक असे तांबे ( तांब्ये ) ठेवतात, त्यात आंब्याची पानं घातलेली असतात. त्या शुभ घटांना कांजीन म्हणतात. त्यापैकी एका भांड्यात वधूसाठी एखादा अलंकार लपवून ठेवलेला असतो. त्या कांजीत नवलख हार गावला ( मिळाला ) असा अर्थ. |
| ६७ | ३६ | कांजीन | सारीली शेनूल्यांनी | त्या घटांची जागा शेणाने सारवून स्वच्छ केली. |
| ६७ | ३६ | मघनीची | चोळी घातली **मघनीची** | फुगडी गीतांमध्ये स्त्रियांच्या वस्त्रविशेषांच्या संदर्भात जेथे जेथे चोळीचे वर्णन आलेले आहे, तेथे तेथे '**गजनींची चोळी**' '**मदनीची चोळी**' असे शब्दप्रयोग उपयोजिलेले आढळतात. हे प्रकार तत्कालीन चोळ्यांचे असावेत. कदाचित लखनवी, मौलवी अशाप्रमाणे '**गझनवी**' हा चोळीचा प्रकार असावा. त्याचेच रूप बदलून '**गजनी**', '**मदनी**' असे झाले असले पाहीजे. |

# भाग ३ रा

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| ७६ | ५ | पुरइती मोआनी | रामा देइना ती धागर रामाच्या गे सत्वानी (सत्वाने) पानी पुरइती मोआनी (पानी पुरई ती मोआनी) | पुरई = पुरवी. ती मोआनी = मोहिनी रामाच्या सत्वाने ती मोहिनी (मोआनी?) पाणी पुरवीत होती. |
| ७७ | ७ | घोटी | बाळा शेल्याची घोटी केली | 'ओटी भरणे' या शब्द प्रयोगाऐवजी कोकणीत 'घोटी भरणे' असे म्हटले जाते. शेल्याची घोटी केली म्हणजे शेला ओटी घेण्यासाठी पुढे केला. |
| ७७ | ७ | मानवली | वैनी गे बाई माझ्या तुझ्या मानवली गे चुड्या। | 'मानवली' (मानावली) मानावणे = इष्ट असा परिणाम होणे. शोभून दिसणे. ह्या गीतातील नणंद आपल्या वहिनीला सांगते की, लक्ष्मीचे आगमन झाल्याने तुझ्या चुड्याला खऱ्या अर्थाने शोभा आली. |
| ७७ | ८ | डूलिता | केगदीच्या वनी गे साप डूलिता | डूलिता = डूलतो. केतकीच्या वनात नाग डोलतो असा अर्थ. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ७८ | १० | चरवा | त्या घराला चरवा पडती | 'चरवा' = ( चरवी ) – दूध साठवण्याचे भांडे कोकणी भाषेत चरवीचे अनेक वचन चरवा असे केलेले आहे. |
| ७८ | १० | हुंबरे | हुंबरे दिये जळती | हुंबरे – ( झुंबरे ) – जुन्याकाळी ताल्वारांच्या महालात हंड्या झुंबरे असत. त्याचे वर्णन. |
| ७९ | १२ | आयाऊ | होस मला मोठी आयाऊ मरणाची | 'आयाऊ मरण' = अहेव मरण. अहेवपणाच्या लेण्यांनी सजलेले मरण. मराठमोळी स्त्री सौभाग्याच्या अवस्थेत मरण मागते. तिची श्रद्धा असते की असे मरण लाभण्यास पुण्याचा साठा असावा लागतो. |
| ७९ | १२ | नीर आजा | नीघाली नीर आजा | मुळची ओळ 'निघाली नार आजा' अशी आहे. इथे 'आजा' चा अर्थ 'आज' असा घ्यावयाचा. ही संपूर्ण ओवी अहेवपणी मृत्यू लाभलेल्या नारीच्या वर्णनाची आहे हे पुढील ओवीवरुन स्पष्ट होते. 'फुडे नी गाडी गेली।' चंदन गे लाकडाची। दुसरी गाडी गेली। काजळ कुंकू माजी। |
| ८१ | १५ | अगमीचा तोंडा | अगमीचा ग तोंडा जळत ओल्यातील | 'अगमीचा' ( मूळ शब्द अग्नीचा ) अग्नीचे तोंड – ( ओल्या ) जळत्या लाकडाच्या पुढचा जळता भाग. इथे अग्नीच्या तोंडाला दिलेले ओले लाकूड असा अर्थ. |
| ८२ | १६ | गुंड्यार | मगे मियांता गुंड्यार फोडलय् | गुडो–गुंडो दगड, गुंड्यार ( गुंड्यावर )–दगडावर |
| ८२ | १६ | घाटणार | मगे मिया तां घोटनार फोडलय् | 'घोटनार' यातील मूळ शब्द 'गोटणार'–गोटणावर असा असावा. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| | | | | गोठण–गोठण, हा शब्द गोष्ठान ह्या संस्कृत शब्दावरून प्राकृतात आणि त्यानंतर मालवणीत आलेला आहे. काही ठिकाणी 'गोठणार' या शब्दाऐवजी गोटणीवर असा स्त्रीलिंगी शब्द बनवून वापरण्याची प्रथा आहे. हा प्रकार मराठीत जसा पुस्तकापासून 'पुस्तिका' शब्द तयार केला जातो तशातील प्रकार म्हणावयाचा. वरील गीतामध्ये 'तवसा' (मोठी काकडी) 'गुड्यावर फोटल्यु' एवढेच वाक्य पुरेसे आहे. त्यानंतर गुड्यावरही न फुटणारे ते गोटणीवर कसे काय फुटणार? म्हणून 'मगो मियां ता घोटणार फोटल्यु' ही ओळच मूळच्या गीतात नाही. ही ओळ अनवधानाने घेतली गेली असावी असे वाटते. |
| ८४ | १९ | दियें बट्टीयेत | दियें बट्टीयेत गे भरी | दियं–द्रव्य, बट्टीयेत–बटव्यात. दियें बट्टीयेत गे भरी–द्रव्य बटव्यात भरुन दे. नाम्याच्या घरी दारिद्र्य आले म्हणून देवाने आपल्या पत्नीला देवीला द्रव्य बटव्यात भरुन देण्यास सांगितले. |
| ८५ | २० | भिवपण | अंकुळसाई देवू भिवपण अहंकाराचं | भिवपण–खूप भयंकर भीषण–ह्या ठिकाणी अहंकाराची परिसीमा व्यक्त करण्यासाठी पुष्कळ, खूप, अपरिमित ह्या शब्दांच्याऐवजी भिवपण हा शब्द वापरलेला आहे. |
| ८५ | २० | कोंती | हत्यावर बसली कोंती (कुंती) | **कोंती**—मूळचा शब्द कुंती–पांडवांची आई–पंडु पत्नी. ती गांधारीला वाण देण्यासाठी गेली. गांधारी अहंकाराने म्हणाली, "तुझे वाण मला नको" कुंतीने तिला कुलपुरुषाची शपथ घातली. शपथीच्या कारणास्तव गांधारीने नाइलाजाने कुंतीजवळून वाण घेतले. असा गीताचा मतितार्थ आहे. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ८६ | २१ | दुवारी | माटवा गे दुवारी हसती जन नारी | माटव–मांडव–मंडप. 'माटवा गे दुवारी' माटवाच्या दारात–मंडपाच्या दारात (नवरदेवाच्या स्वागतासाठी) उभे असलेल्या नरनारी (जननारी) हसू लागल्या. वरची ओळ (संदर्भासाठी)<br>शंबू दिसता गे म्हातारा । गिरजा दिसते गे नवरी ॥ |
| ८७ | २२ | नीवा | सारवरेचा निगे नीवा पचवा तेनी त्यावा | सारवरेचा नीगे नावा = साखरेचा मेवा. 'नि गे' हा शब्द कोकणी गीतांमध्ये बऱ्याचवेळा येऊन जातो. केव्हा केव्हा तो ओवीला आकार देण्यासाठी पूरक म्हणून वापरलेला असला तरी 'नी गे' ह्या शब्दाच्या मूळ अवस्थेचा विचार केल्यास तो मुळात न्हय गे,= नाय गे, = 'नाही ग' असा आहे. गीतांच्या पहिल्या भागात 'काळी नी गे चंद्रकला' अशी एक ओळ (पान क्र. १७, गीत क्र. १९) आलेली आहे. त्याचाही असाच अर्थ लावला पाहीजे. त्याच ओवीत सांगावयाचे म्हणजे "काळी न्हय गे ऽ चंद्रकला" असाच लावला पाहीजे." बऱ्याच कालावधीनतर एखादा माणूस एखाद्या कोकणी म्हातारीला दिसला आणि तिने त्याला ओळखले तरी ती आपल्या शेजारणीला विचारील, "तो भेरर उभो न्हवलो हा तो बावल्याचो झील "न्हय गे" तो ?" इथे ही 'न्हय गे'चा उपयोग त्याच अर्थाने आहे. |
| ८७ | २२ | ननीचा | नीवाला माझ्या बट नको ननीचा पाला | ननी = एक औषधी वनस्पती |
| ८८ | २३ | अप्रस | काटिला अप्रस रस | अप्रस – आररस – कोणत्याही फळाचा. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| | | | | कोकणाच्या बाबतीत बोलायचं तर फक्त नारळाचा ( म्हणजे खोवर किसून आत पाणी बिलकूल न घालता पिळून काढलेला ) रस. अशा रसालाच 'आपरस' म्हणावयाचे. इतर भागात कोणी याला 'नारळाचं दूध' असेही म्हणतात. हा रस आंघोळीपूर्वी अंगाला लावण्याची प्रथा अजूनही आहे. विशेषता दिवाळीच्या अभ्यंगस्नानाच्यावेळी कोकणात हा रस अंगाला लावतात. ह्या रसाचा उपयोग कोकणी स्त्रिया कोकम कढीत माशांचे सार बनवितांना ही करतात. |
| ८८ | २३ | कुपी | पाजीली अमृत कुपी | 'कुपी' हा शब्द सुद्धा कुपी या शब्दाचे भ्रष्ट रूप आहे. 'पाजिली अमृत कुपी' असे म्हटले तर गेयतेला बाधा येते. म्हणून कुपीचे कुपी झाले. ही गीते "गाइली ऐकिली गाइली" अशा प्रकारची असल्यामुळे त्यांच्या अर्थाने 'श्रुती' प्रथमास्त्री आहेत. |
| ९० | २४ | निकुंबळी दारोडी | निकुंबळी पाहून गे होम मांडीला दारोडी | ( १ ) निकुंबळी–मूळचा शब्द 'निकुंभिला' हा रावणपुत्र इंद्रजिताचा किल्ला ( रामविजय अध्याय २९ ओवी क्र. ५८,६९ ). हा किल्ला रावणाच्या लंकेपासून थोडा दूर होता. इंद्रजिताने राम रावणयुद्धामध्ये आपणास जय मिळावा म्हणून ह्या दुर्गम किल्ल्यावर 'दारुण' ( दारोडी नव्हे ) तप आरंभिले. त्यासाठी होम हवनादी प्रयोगही केले असा उल्लेख आहे. ( २ ) कुंभ आणि निकुंभ असे राक्षस रावणाच्या पदरी होते. प्रथम कुंभ ( राम लक्ष्मणांकडून ) मारला गेला. त्यानंतर हनुमंताने निकुंभाला युद्धात मारले. 'निकुंभली पाहून' ह्या ओळीत कदाचित निकुंब बळी पाहून असाही अर्थ घेता येईल. पण ह्या अर्थापेक्षा पहिला अर्थ अधिक योग्य वाटतो. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ९० | २४ | मर्तीने | लंकेच्या मर्तिने होम टाकिला विद्वासूनी। | मर्तीने–मारुतीने ( इंद्रजिताचा होम विद्वासूनी ( विध्वंस करुन ) टाकला असा अर्थ. |
| ९० | २४ | अळंगीले | लक्ष्मणाने अळंगीले गे। | अळंगिले–वरचेवर परतून लावले. इंद्रजिताने लक्ष्मणावर सोडलेले बाण लक्ष्मणाने वरचेवर ( अळंग ) परतून लावले. |
| ९० | २४ | मिरिया | घेतली पत्रिका तीने मिरिया घातली | मिरिया–( हा शब्द मिरिया असा चुकून लिहीला गेला असला पाहिजे. मूळचा शब्द ' निरिया ' असा आहे. इंद्रजिताच्या तुटून पडलेल्या बाहूकडून लिहिले गेलेले पत्र त्याच्या पतिव्रता स्त्रीने ( सुलोचनेने आपल्या निरीत खोवले, असा अर्थ होतो. त्या अवस्थेत ती आपल्या पतीच्या निधनाची कथा आपल्या सासऱ्याला ( रावणाला ) सांगण्यासाठी निघून गेली हा संदर्भ लक्षात घेता आणि रामायणकालीन स्त्रियांच्या वस्त्रप्रावरणाचे केलेले वर्णन पाहता पत्राची घडी तिने निऱ्यांच्या गाठीत ठेवली हेच अधिक संयुक्तिक वाटते. मिरिया या शब्दाला ह्या संदर्भात काही वेगळा अर्थ आढळून येत नाही. |
| ९१ | २४ | वळमिली | वाचूनी पाहीली त्याने धरणी वळमिली | वळमिली–वळवणे–वळमणे,–खाली ओढून हातात घेणे. त्याने दुःखाने धरणीच कवेत घेतली. |
| ९१ | २४ | कुंवळी | मी कुंवळी शेणाची | कुंवळी – कुमारी – कन्या, मुलगी. |
| ९१ | २४ | उभी राहा | तुम्ही गुढी उभी राहा वेपाचे | मूळची ओळ, " तुम्ही गुढी उभारा वशाची " अशी आहे. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ९२ | २६ | गिडीन/सारंग | गिडीत पाणी न्हाई। सारंग लांट् जाई | गिडी – घंगाळाच्या आकाराचे तांब्या पितळेचे जुन्या काळचे भांडे. येथे गिडीन हा शब्द चुकीने पडला आहे. मूळचा शब्द गिडीत असा आहे. पुढच्या सारंग शब्दाचा संदर्भ देता येत नाही. |
| ९३ | २७ | ग्वबली | बी ग्वबली रूजवली | ग्वबली – रुजली (ग्वबली हा शब्द लिहून घेताना चुकलेला आहे.) |
| ९३ | २७ | कुबेटी | फळ कुबेटी झाली | कुबेटी – (अर्धवट पिकलेली) याला कोंकणीत 'कुंबटकच्ची' असे म्हणतात. |
| ९४ | २८ | बदाण/भागडणी | बदाण भर गं भागडणी | बदाण – वाटण, जेवणाचे पदार्थ वाढून ठेवावयाचे भांडे. भागडणी – भागलणी, भागेलणी (मूळचा अर्थ वाटेकरीण) येथे मैत्रीण असा आहे. |

# भाग ४ था

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ९७ | १ | कागाचे | शेर शेर गोणे कागाचे | **कांगाचे** – कांगाचे. कांग हे एक प्रकारचे धान्य. कोकणी घरामध्ये ह्या कांगाच्या धान्यापासून 'खांटोळ्या' नावाचा गोड पदार्थ तयार करतात. ह्या धान्याचे कणीस बाजरीच्या कणसासारखे लांबट आकाराचे असते. |
| ९७ | १ | कोनीत | म्हातारेचे कोणीत घाल्न घेव | **कोणीत** – कोनाड्यात, म्हाताऱ्या बाईची बसण्याउठण्याची जागा. अडगळीच्या जागी, कोनाड्यात. ह्या जागेला कोनी म्हणण्याची प्रथा आहे<br>**घाल्न घेणे** – अवमान संपल्यासारखे शरीर झोकून देणे, पडणे. |
| ९९ | २ | हारी | वगलय गो चेड्या देवाच्यो हारी | **हारी** – कडे. देवाच्याहारी म्हणजे देवाकडे. |
| ९९ | २ | कलम्या (तलम्या) | कलम्या कापाड न्हयामाना न्हयामाना | तलम्या – तलम. |
| ९९ | २ | वाघदोळे | कुकमाचे चिरयेक वागदोळे, वागदोळे | वागदोळे – वाघदोळे. कुकवाची चिरी वाघदोळ्यासारखी लाल भडक. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ९९ | २ | | खामल्या खामल्या दयवाचे पाय धरु पाय धरु खामल्याच्या ऐवजी मूळ शब्द 'खयलया' असा असेल तर "खयल्या देवाचे पाय धरू, पाय धरू" असा सरळ अर्थ होईल. | कोकणातील ग्रामदेवांचे खांब असतात. ज्यांच्या अंगात ती ती दैवतं येतात त्यांना 'मड' म्हणतात. हे मड त्या देवाच्या नांवाचा जो खांब असेल तो घेऊन वदतात. ( वदणे-अंगात येणे, संचारणे ) त्या खांबाची पूजा अर्चा होते. तेथे नवस केले जातात. त्या खांबाला—तो खांब देवीच्या नावाचा असेल तर लुगडे आणि तो देवाच्या नावाचा असेल तर जुन्या पद्धतीचे धोतर नेसवतात. असे सजवलेले रंगीत खांब हातात घेऊन 'मड' 'वदत' असतात. अशा खांबांनाच 'खामल्या देव' असे म्हटले जाते. |
| ९९ | २ | गुजुल्यो | खामलया दयवाच्यो गुजुल्यो गुजुल्यो | गुजुल्यो – हा वस्त्र प्रकार असावा. गुजुल्यो ह्या शब्दाचा दुसरा एक अर्थ आहे, 'गजाली' पण तो येथे संभवत नाही. |
| ९९ | २ | खुजुल्यो | इयाळा पानयात खुजुल्यो खुजुल्यो | खुजुल्यो – हा शब्द कोकणीत नाही. ह्या ऐवजी 'भिजवल्यो' अथवा कुजवल्या. भिजविल्या असा शब्द असू शकेल. नवे वस्त्र शिळ्या पाण्यात भिजवून ठेवले आणि नंतर धुतले तर ते वस्त्र 'भरते' म्हणजे त्या वस्त्राची सूते व्यवस्थित भरतात. असे वस्त्र टिकाऊ बनते, रंगही तजेलदार राहतो अशी इकडे समजूत आहे. |
| १०० | ३ | राकांचा | येवेस्तु जाल्या राकांचा राकांचा | राकाचा – राखांचा, राखूचा, राखण करावी. |
| १०० | ३ | राकता पाकता | राकतां पाकतां इयाला इयाला | राकता – पाकता – राकता राकता – राखत असतानाच. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| १०० | ३ | दाड्यो पाचेल्यो | खरवस खातां खातां दाड्यो पाचेल्यो | दाड्यो पाचेल्यो – दाड्यो – दाढ्यो, पाचेल्यो – नेहमीचा अर्थ नवी पालवी फुटली. इथे अर्थ – दाढ्या वाढल्या दाढ्या मिशा आल्या. |
| १०२ | ४ | तिकलो | तिकलो येत तर मारुन जायत | तिकलो – टिकलो. हे बैलाचे नांव. कोंकणातील ही प्रथा आहे. बैलाची नांवे त्याच्या रंग-वैशिष्ट्यावरुन ठेवली जातात. काळया पांढऱ्या अथवा तांबड्या पांढऱ्या रंगाचा बैल असला तर बाळ्या, शिंगाजवळच्या भागावर दोन वेगवेगळे रंग असले तर मोऱ्या, कोल्ह्याचे रंगाचे जनावर असले तर कोल्ह्या, काळया पांढऱ्या रंगाचा असेल तर कासाऱ्या इत्यादी. डोक्यावर टिपका असलेल्या बैलाला '**टिकलो**' (तिकलो) असे नाव दिले जाते. काही वेळा विशिष्ट दिवशी जन्माला आलेल्या बैलाचे नांव त्या त्या दिवसाचे देण्याची प्रथा आहे. उदा. आयतवारगो, (रविवार) आयतवारी जन्माला आलेला म्हणून. सोमगो बुधगो इत्यादी. |
| १०३ | ५ | आदाळ्या पादाळ्या | आदाळ्या पादाळ्या खयरे जातय | **आदाळया पादाळया** – या शब्दांना तसा नेमका अर्थ काहीच नाही 'अरे भल्या माणसा, खय रे जातय?' असाच अर्थ घ्यावयास हवा. |
| १०३ | ५ | दर्वांराक | जातंय जातंय दर्वांराक दर्वांराक | दर्वांराक – शेताक – शेताकडे – शेतावर |
| १०४ | ७ | दुदुरली | दुदुरली कुर्ली दुदुरली कुर्ली | **दुदुर्ली – दुदुरली** – कोंकणातील गोड्या पाण्याने भरलेल्या नदीत वेगवेगळ्या आकाराच्या आणि रंगाच्या (काळ्या, काळ्या पांढऱ्या रंगाच्या आणि पांढरट रंगाच्या) कुर्ल्या (खेकडे) मिळतात. कोंकणी माणसाला पावसाळ्याच्या दिवसात त्यांचे 'कालवण' खायला मिळते. तो त्याच्या मेजवानीचा एक भाग आहे. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| | | | | ह्या खेकड्यामध्ये आकाराने थोडा लहान साधारणपणे रुपयाच्या आकाराचा, पाटच्या फिकट रंगाचा, मंद हालचाल असलेला, असा एक प्रकार आहे. त्याला "दुदुरली कुरली" असे म्हणतात. ह्या कुरलीला हे नाव देण्याचे कारण असे की, ह्या प्रकारच्या कुरलीच्या अंगातून दुधासारखा पांढरा द्रव पाझरत असतो. इतर खेकड्यांचा पृष्ठभाग काळसर आणि टणक असतो. दुदुरली कुरलीचा पृष्ठभाग मऊ असतो. थोडीशी चेंगरली तर लगेच मरते. हालचालही मंद असते. काही महाभाग ही कुर्ली कच्ची खातात. |
| १०४ | ७ | दूदला | दूदला पाणी न्हाय गो | दूदला – दुधासारखा – दुधासारखे. दुदुरल्या कुर्लीच्या अंगातून स्त्रवणारा दुधासारखा पदार्थ पाहून केलेली कवी कल्पना. त्या कुरलीला उद्देशून (खेकड्याला) 'दुधाची आंघोळ कर' असे सांगितले आहे. |
| १०७ | १० | गवटा | केळीच्या गवटा<br>केळीच्या गवटा | **गवटा** – एकात एक असलेल्या कप्पा, कांद्याच्या पातीसारखा.<br>कळीच्या खोडाचा एक एक 'गवटा' नव्या नव्या पानाच्या जन्माबरोबर खोडाच्या पृष्ठभागावरुन 'घळत' असतो. ह्या ओळीला तसा काही अर्थ नाही. केळीच्या खांबाकडे पाहाता पाहाता, जिचे लग्नाचे वय झालेले आहे अशी मुलगी "माझे आता लग्न करा" असे स्पष्टपणे सांगू शकत नाही. ती त्यासाठी 'नाव माझा पलटा' असे सूचक वाक्य गुणगुणते ! पलटा म्हणजे **बदला** – बदल करा. |
| १०७ | ११ | तोणीत | ह्या गे (हया गे ?)<br>म्हारणीच्या तोणीत | तोणीत हा शब्द कोकणीत नाही.<br>टोणा हा शब्द कोकणीत आहे. त्याचा अर्थ एखाद्या रानाचा (रानवट जमिनीचा) पुढे आलेला भाग. तो भूभाग लहान असेल तर त्याला कदाचित टोणीत म्हणत असावेत. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| | | | | म्हणजेच म्हारणीच्या टोणीत याचा अर्थ महारवाड्यातील विशिष्ट जमिनीत असा घ्यावा लागेल. |
| १०८ | १२ | जीवनाक | मामा जाय जीवनाक तो तानेलो | जीवनाक ऐवजी जेवनाक असा शब्द असावयास हवा असे वाटते. मग अर्थ बरोबर लागतो. म्हणजे " मामा जेवक गेलो तो तानेलो " अशी संगती लागते. |
| १११ | १५ | रांटा पिवळा | रांटा पिवळा घेऊनिया | **रांटा पिवळा**—ह्या शब्दातील पिवळा रंग हळदीचा.<br>राटा हा शब्द ( हळद चढविण्याच्या प्रकारात ) हळदीच्या भांड्यासाठी वापरला असावा. म्हणजे " हळदीचे भांडे घेऊन, बाईसाहेब, बाहेर या. " असा अर्थ होईल. |
| १११ | १५ | परी | माटवाच्यो परी देकून ( देखून ) | देकून—देखून—पाहून. माटवाच्यो—मांडवाच्या, मंडपाच्या.<br>परी—वेगवेगळ्या प्रकारच्या कलाकृती ( मंडपाची सजावट )<br>येथे परी म्हणजे अनेक प्रकार. कोकणी भाषेत हा शब्द नेहमीच्या बोलण्यातही ऐकू येतो. वाक्य संदर्भानुसार परी ह्या शब्दाचे अर्थ बदलत असतात. उदा.—<br>( १ ) हल्लीच्या मुली तऱ्हेतऱ्हेचे कपडे वापरतात.<br>हालीची पोरां **परीपरीचे** कपडे वापरतत.<br>( २ ) त्या म्हातारीने आपल्या सुनेचे खूप हाल केले.<br>त्या म्हातारेन सुनेच्यो काय परी परी केल्यान. |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| १११ | १५ | ल्होट्यादारी | रुक्मिण पावली ल्होट्यादारी. | लोटा—ओटा, ओटी<br>कोकणातले घरही कोकणातल्या माणसासारखे वैशिष्ट्यपूर्ण आहे. महाराष्ट्रातल्या मंदिरांची रचना हेमाडपंतानी मांडली असे म्हणतात. पण कोकणातल्या घराची रचना ज्याने केली—म्हणजे त्या घराचा एक चौकटीतला आराखडा ज्याने पहिल्याने आखला असेल, त्या माणसाच्या बुद्धीचे कौतुकच करावयास हवे. इतकी ही गृहरचना येथील हवामान, निसर्ग, लोकरीती यांचा खूप विचार करुन केलेली आहे. सबंध कोकणपट्टीत मध्यमवर्गीय शेतकऱ्यांचे घर साधारणपणे एकाच साच्याचे असते. गरीबांची घरे ह्या साच्यात बसत नसली तरी त्यांच्या ऐपतीप्रमाणे त्यांचेही एक विशिष्ट असे " मांगरी " रुप आहे. ही मध्यमवर्गीयांची घरे आजही पाहिली तरी त्यांच्या ठेवणीमागील आणि रचनेमागील बुद्धीकौशल्याची तारीफ करावी तेवढी थोडीच.<br>मध्यमवर्गीयाच्या ( कोकणी ) घराची साधारण रचना पुढील वैशिष्ट्यांनी युक्त असते.<br>( १ ) प्रत्येक घरापुढे उन्हाळ्यात सुदर अंगण, बाजूला मातीच्या सोईस्कर आकाराच्या पेळा ( धक्के ) असलेले. शेणाने स्वच्छ सारवलेले, गवताने शाकारलेले. त्या खालच्या बांबूच्या काठ्याही सरळ सारख्या अंतरावर. अंगणात तुळस. तुळशीच्या माथ्यावरचा भाग तेवढा उघडा. तेथे गवती शाकारणी नाही.<br>( २ ) घराचा पुढला भाग ( आजच्या भाषेतील व्हरांडा ) पण त्याला ' पडवी ' म्हणावयाचे नाही. मांगरी घराच्या पुढच्या भागाला पडवी म्हटल्यास चालेल. ह्या भागाला ' सदर ' |

## विवेचन

म्हणावयाचे. ह्या भागात फक्त पुरुषमाणसांचाच राबता. चांगल्या घरच्या स्त्रिया सहसा ह्या भागात ऊठसूट दिसावयाच्या नाहीत असा शिरस्ता.

( ३ ) त्यानंतरचा भाग ह्याला 'ओटी' हे लघुत्वदर्शक नाव वापरावयाचे नाही. याला 'लोटा' म्हणावयाचे. सदरेपेक्षा हा भाग हातभर जादा उंच. ह्या भागात घरातील 'खाशा' माणसांची बैठक. येथेही स्त्रियांना मज्जाव. त्या लोट्याच्या घरच्या अंतर्भागाकडील भिंतींना छोट्या खिडक्या. यांना चुकूनसुद्धा लोखंडी गज असावयाचे नाहीत. कातीव लाकडी गज. ह्या लोट्यापर्यंतच घराला उजेडाचा सहवास. ह्याच्या आतील भागाला उजेडाचा अभावच. अशा भागातच स्त्रियांचा **पायरव** असावयाचा. त्यांनी बाहेर पाहावयाचे झाल्यास त्या झरोकावजा खिडकीतून पहावे. ( दरवाजातून वाकून झुकून सदरेकडे अथवा लोट्याकडे पाहणे शिष्टसंमत नसे. यातही आणखी एक विशेष म्हणजे सदरेवर वा लोट्यावर बसलेल्या पुरुष माणसांना आतील स्त्रियांचे दर्शनही ( अंधारामुळे ) घडत नसे. मात्र आतील स्त्रियांना बाहेर बसलेले पुरुष दिसू शकत असत. त्यामुळे बाहेर किती माणसे बसली आहेत, काय बोलणी चालली आहेत, याचा अंदाज येऊ शकत असे. जेवण, खाण्यापिण्याचे पदार्थ किती प्रमाणात वापरावयाचे याचा अंदाज लागत असे.

( ४ ) आतील चौकाला 'वळई' म्हणावयाचे. ह्यातील तुळया सागाच्या किंवा फणसाच्या फूट फूट रुंदी जाडीच्या. ह्या वळईत स्त्रियांची ये जा असायला मज्जाव नसे. अशा घरात गणेश चतुर्थीच्या वेळी गणपतीची स्थापना बहुधा वळईतच करीत असत. फुगड्या वगैरेंचे कार्यक्रम करण्यासाठी ऐसपैस जागा मिळत असे. मात्र ह्या वळईच्या

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
|---|---|---|---|---|
| ११३ | १७ | सैवार | लेकी तुझा परानपती<br>सैवार न्हॉक याता | **सैंवार** – स्वयंवर, मात्र येथे स्वयंवर असा अर्थ नसून लग्न, विवाह असा अर्थ.<br>सैवर न्हॉक – स्वयंवर ( लग्न ) करण्यास.<br>कोकणीत ' नीम मोडणे ' असा एक विवाह विधी आहे. त्यावेळी एका विशिष्ट पद्धतीने वधूने ( आणि वरानेही ) आंघोळ करावयाची असते. यावेळी निमेपण ( ब्रह्मचर्याश्रम ) संपले असे समजण्याचा तो एक प्रकार आहे. ह्या विधीमुळे कोकणात " लग्न केले " असे म्हणत नाहीत. ' लगीन न्हाले ' म्हणतात. त्यामुळे सैंवार न्हॉक ( न्हावक ) असा शब्द प्रयोग आलेला आहे. |
| ११५ | १९ | पनसाच्या दावांनी गे | माटव शिवलो<br>पनसाच्या दावांनी | पनसाच्या दावांनी – फणसाच्या झाडाला अगदी मुळापासून वरपर्यंत फणसाची फळे लागतात. एका एका ठिकाणी ३/४ फणस लागतात. फणसाच्या फळाचा देठ असतो त्याला फणसाचे दांव असे म्हणतात. कोकणातील लग्नघरचा मांडव कोकणातल्याच फळा-फुलांनी शृंगारलेला असतो. त्याला फणसाची फळेही अपवाद असू शकत नाहीत.<br>" शिवंण " हे क्रियापद कोंकणीत ' शाकारणे ' ह्या क्रियापदा ऐवजी वापरतात. जसे माडव शिवणे–इ. |
| ११५ | २० | राई दोरी | गोळण ताक चाळी<br>कृष्णान धरली<br>राई दोरी | ताक चाळणे – दही घुसळून ताक काढणे.<br>राई दोरी – रवी दोरी. ताक घुसळण्याची रवी दोरी. |
| ११५ | २० | तोरी | तुला खायला देते तोरी | तोरी – तोर. कच्चे फळ. विशेषता कैरी : |

| पृ. क्र. | गीत क्र. | शब्द | संदर्भ | विवेचन |
| --- | --- | --- | --- | --- |
| ११६ | २० | चीमुवानी | जशी चिमुवानी पानी काढी | चिमुवानी – चिमुल्यानी – चिमल्यानी – छोट्या तांब्याने असा अर्थ असू शकेल. |
| ११६ | २० | दिलशाची तिरमी | जशी दिलशाची तिरमी | गीताचा संदर्भ पाहता "दिलशाची तिरमी" हा शब्द चुक वाटतो. त्याऐवजी "दिलशाचा (दिलाचा) तो रंग!" हा शब्दप्रयोग बरोबर आहे. शिवाय वरील ओळीतील लवंग या शब्दाशी तो रंग हा शब्द यमकाच्या दृष्टीनेही जुळतो. म्हणून 'जसा दिलाचा तो रंग' अशी शब्दरचना घ्यावी लागेल. एरवी वरील ओळीला काहीच अर्थ राहत नाही. याऐवजी "लव (लव) गे आटीयेचा" अशी ओळ हवी. सीतेला लव आणि कुश असे दोन पुत्र होते. यासंबंधीची कथा या गीतात आहे. आटीयेचा. आटीतील. |
| ११८ | २३ | **माळाप** | सीतेचा गे **माळाप** | **माळाप**—केसात (वेणीत) फुले माळण्याची कृती. कोकणात असे अनेक शब्द वापरात आहेत. उदा. माळाप, गाळाप, टाळाप, मळाप, दळाप, काढाप इ. |
| ११८ | २३ | लऊ गे **आटीयेचा** | लऊ गे **आटीयेचा** | लवू गे आटियेचा— ही ओळ चुकीची. |
| ११८ | २३ | **चीमुवानी** | पानी हाडीता (आणीता) **चीमुवानी** | **चीमुवानी**— पृ. ११८ गीत २० प्रमाणे |
| १२१ | २४ | **गनगेत** | रुमड मियां गनगेत **टाकलो** | **रुमड**—औदुंबराचे फळ. कोकणात औदुंबराला रुंबड, रुमड असे म्हणतात. **गनगेत**—गंगेत (कोकणात कोणत्याही नदीला भाविकपणे गंगेच्याच जागी मानतात.) |

❀

# कोकणी लोकगीतातील मामा व मामी

लहानपणची कोकणातील आठवण झाली म्हणजे प्रथम आजोळ आठवतं. आजोळची अपूर्वाई लहानपणी जशी व जितकी, विशेषतः माझ्या पिढीतील मुलानी अनुभवली तितकी ती आता तशीच आजच्या पिढीतील कोकणी मुले अनुभवतात की काय कुणाला ठाऊक ! बहुधा नसावी. अजूनही मी कोकणात गेलो की माझ्या खेड्यात घरोघरी हिंडून येतो. पाय व मन मोकळे करून येतो. पण आमच्या लहानपणी घराच्या ओटीवर असणारा दोरीचा झोपाळा क्वचितच दिसतो. असलाच तर झोके घेणारी बाल मंडळी ( व प्रौढ मंडळी पण ) दिसते खरी पण त्यांच्या तोंडी आम्ही लहानपणी आळवून व आवेगाने म्हटलेली ती कोकणी लोकगीते तर मुळीच ऐकू येत नाहीत. मात्र अजूनही डोंगरदऱ्यांत व सावंतवाडी, वेंगुर्ले, कुडाळ, मालवण सारख्या शहरांपासून दूर आडवळणाला व आडोशाला राहिलेल्या गावांत कुळवाडी माळवाडी समाजात ही गीते आवर्जून म्हटली जातात.

प्रारंभीच मी ' आजोळची अपूर्वाई ' असा शब्द प्रयोग वापरला. आजोळला लहानपणी जसं जायचं ते आजीनं गळ्याला किंवा शेजीला पाटवलं म्हणून. आजीला नातवंडांची ओढ तशीच नातवंडांना पण आजीची. तसच मामाला भेटणे व मामीची माया मिळवणं हाही एक हेतु मनात असायचा. मामा-मामींना आपल्या भाच्यांचं व भाचीचं कोण कौतुक ! शेतकामात, कुठे घरकामात गुंतलेले मामा व त्याना पावलोपावली छायेसारखी साथ करणाऱ्या मामया; थोरली मामी, धाकटी मामी, मधली मामी...आजोळच्या त्या जगात भाच्याला भलतच मोठेपण प्राप्त व्हायचं ! प्रत्यक्ष घरी आईवडीलाचा जितका लळा लागलेला असायचा त्याहून अधिकच आजोळची ओढ लागलेली असायची. प्राचीन काळापासून हे ' आजोळ ' कोकणी लोकगीतात सारखं वावरतं आहे. त्यात उमटलेली मामाची व मामीची शब्दचित्रे व त्यांची मिस्कील अशी गोड थट्टा मनाला मोठी भुरळ पाडते व लहानपणचं आजोळचं अकृत्रिम सुख सारखं आठवू लागतं. उगीचच मग आता मन हुरहुरतं.

एका कोकणी लोकगीतातील खालील काही ओळी अशा आहेत.

**यव् यव् कुत्र्या मोगरया मोगरया**
**ससो पळालो डोंगरया डोंगरया**
**डोंगरी मांगरी जायचे कळे । जायचे कळे**
**जायचे कळे डोंगरया । डोंगरया**
**उठ गा मामा कैवाऱ्या कैवाऱ्या**
**मामी जाता मायेरा मायेरा**

जाता तितकी जावने जावने
न्हय पैलाडी पावन् ये पावन् ये
न्हयक आला लोणा लोणा
भिजला गा मामा तुजा गोंडा गोंडा

हें दीर्घ असं गीत आहे. त्याचा हा प्रारंभीचा भाग. आजोळ म्हटलं म्हणजे जशी मामा मामी आली तसच आजोळचा कुत्रा पण आला. त्या कुत्र्याला 'यंव् यंव्' अशी हाक मारायची. त्याला सांगायचं डोंगरात ससा पळाला. डोंगरात एक मांगर आहे. या मांगराजवळ जाईचा मंडप आहे. जाईचे कळे आहेत. मग मामाला म्हटलं जातं, 'अरे मामा ऊठ बाबा. (असा बसून का?) तू कैवारी ना? मामी माहेराला जायला निघाली आहे. ती जाते आहे तर तिला जाऊ दे. (आडकाठी नको करूस) तिला नदी-पलीकडे पोचवून ये. मग मामा तिला नदीतून पलिकडे घेऊन जात असताना नदीला मोटा लोंढा येतो आणि त्या लोंढ्यात चढलेल्या पाण्याने मामासाहेबांचा गोंडा भिजतो. (मामा-साहेब बहुधा पगडी घालून मामीला पोचवायला आलेले असावेत.)

मामा मामीचं जीवन या गीतात रंगविताना त्यांचं गोड भांडण शब्दात पकडण्यात लोकगीतकार विशेष रूची व आपुलकी दाखवतो......मामाची बागाईत असते. कवाल्याना (लहान नारळीची रोपटे, पालवणारी व वाढणारी) पाणी द्यायला मामा आगरात जातो. त्याचा जीव तहानेने कासावीत होतो. भाचा मामाबरोबर बागांत गेलेला असतो. तो मामीला ओरडून सांगतो...(मामी पण बागांत कवाल्याना पाणी द्यायला, पाणी परतायला आलेली असतेच)...'मामी, मामा पाण्यासाठीं जात होता पण तो तहानेला आहे... त्याला गाडगी भरून पाणी आण.' मामी गाडगी भरून पाणी आणते. तहानेचा प्रश्न सुटतो. पण पुढे भाचा विचारतो मामा मामीना 'या एक एका गाडग्याची किंमत किती?" मामा सांगतो, "एक रुपया" तर मामी सांगते, 'एक पैसा'...दोघांची दोन टोकें. मग भाचा म्हणतो, 'रुपया झाला खोटा। मामाला मुलगा झाला मोटा'...मामा मामीला मुलगा हवा असतो आणि भाचा त्यांच्याच गोड भांडणांतून आशावाद निर्माण करतो त्यांच्यासाठी. खालील कोकणी लोकगीत पहा :—

कवात्यान कवातो पालेलो, पालेलो
मामा जाय जीवनाक तो तानेलो। तानेलो
हाड गे मामी गीडग्यानी पानी। गीडग्यानी
पानी

यायाक गीडग्या कितक्याचा। कितक्याचा
मामा सांगता रुपयाचा। रुपयाचा
मामी सांगता पैशाचा। पैशाचा

**रुपयो जालो खोटो । खोटो**
**मामाक झील झालो मोटो......**

मामीचा भाच्याला किंवा भाचीला कशावरून तरी राग आलेला असतो. आता ते ठरवतात. भाचा–भाची, की मामा घरी आल्यावर त्याला मामीच्या चहाड्या सांगायच्या व मामीला मामाकडून मार द्यायचा. (मामीला मामाकडून मधून मधून हा प्रसाद मिळतच असतो.)...भाचा भाचीना अशा वेळी मामीपेक्षा मामा मोठा वाटतो. आपला वाटतो. गीताची सुरुवातच मोठी कुरेबाज केली आहे. डोणीवर एक पांखरूं बसलं आणि ते झोप घेत आहे. त्या पाखराला उद्देशून प्रथम गीतकार म्हणतो, 'अरे, त्या डोणीवर पाखरू झोप घेते आहे असं म्हणतो ना?...घेऊ दे त्याला झोप. घेईल तितकी घेऊ दे... (मामा आल्यावर त्याची झोप मग आपोआपच उडेल.) कारण मामा आल्यावर मामाच्या मांडीवर बसून भाचा त्याला मामीच्या उखाळ्या पाखाळ्या सांगणार ना? मग मामा चीडणारच. मग त्याचा पारा चढला की मामीला मार मिळणारच...(नंतर पाखराची झोप आपोआपच उडणार. नाही का?)

ते गीत कसं आहे पहा :

**डोण्यार पाखरू झोप घ्याता ।**
**झोप घ्याता ।**
**घ्याता तीतको घेवने । घेवने**
**मामाक सांजे आमच्या येवने । येवने**
**मामाचे माणये बसतलय् । बसतलय्**
**मामीच्यो चाड्यो सांगतलय् । सांगतलय्**
**मामीक मारूक लावतलय् । लावतलय्**

कोकणांत घरांना 'दारूस्त्या' असतात. दारुस्त्या म्हणजे घराची दारे बसवलेली असतात त्या दारावरच भिंतीत लाकडी लांबलचक खोबणी केलेल्या असतात. ती दारुस्ती. त्या दारुस्तीवर हव्या नको त्या घरगुती वस्तू ठेवून द्यायच्या. दारात उभं राहून दारुस्तीवर सहज हात जातो. हवी नको ती वस्तू घ्यावी. पुनः ठेवावी. फणीपासून तो बाहुल्यापर्यंत सर्व जिन्नसा दारुस्तीवर आढळणारच. अशाच दारुस्तीवर पडलेल्या दोन बाहुल्यांशी गीतकार संवाद करतो. तो त्या बाहुल्यांना विचारतो. (अर्थातच पूर्वी व अजूनही सावंतवाडीला तयार होणाऱ्या त्या लाकडी बाहुल्या असाव्यात)......"दारुस्तेवरच्या बाहुल्यांनो तुम्ही कुणाची वाट पाहता?" मग बाहुल्या बोलतात, "आमच्या मामाची वाट आम्ही बघतो आहोत." पुढे त्या त्याला सांगतात, "तुझा व माझा मामा येत आहे. देवाच्या तळीवर हातपाय धूत आहे. तो देवाची पूजा करीत आहे. होय बाई, तो देवाला नारळ फोडतो आहे आणि तेथे जमलेल्या सगळ्या मुलाना नारळाचा प्रसाद वाटतो आहे." ते गीत पुढीलप्रमाणे आहे.

दारुस्तेवरच्या दारुस्तेवरच्या बावल्यानु गो।
बावल्यानु गो
कॉनाची वाट तुम्ही बगताशी गो।
बगताशी गो
बगतंय् बगतंय् माझ्या मामाची। मामाची
तुजो मामा माझो मामा याता हा। याता हा
तळयेत हातपाय धूता हा। धूता हा
दयावाची पूजा करता हा। करता हा
दॅवाक नाल बाये फोडता हा। फोडता हा
सगळ्या पॉराक वाटता हा। वाटता हा

एका गीतात गोरा मामा आपल्या गोऱ्या बहिणीला माहेरी आणायला जातो. त्या गीतातील पहिल्याच ओळी अशा आहेत.

हे पात्येक ते पात्येक झिगी मिगी दोरा
गोऱ्या मामा पाना खा। पाना खा
गोरे बहीणीक आणूक जा। आणूक जा
गोरी बहीण बाई चुड्याफाड्यांची
तू येरे हत्ती घोड्यानी। हत्ती घोड्यानी

मामाने वस्त्रे परिधान केली आहेत ती झिगमिगणाऱ्या दोरांची! पानविडा तोंडात आहे. त्याचं गोरं तोंड रंगत आहे. त्याची बहीण उफाड्याची व दागिन्यानी मढवलेली आहे. तिला तो हत्ती घोडे घेऊन आणायला जाणार आहे—

गणपतीकडे मामी फुगडी घालते आहे आणि मामाची नजर तिच्यावर आहे. मामी बसफुगडी घालते आहे. ती अंजरी साडी नेसली आहे. गणपतीच्या पाठीकडे दुर्वांची पेंडी आहे. मामीच्या साडीचा पदर पण गंजरी आहे.

गणपतीचे पाठकडे दुर्येची पेंडी
बस फुगडी घाल त्याची अंजरी साडी
अंजरी साडीचा गंजरी पदर
मामी बसली पूजेला। मामाची नदर
फुगडी फू...फू...फू...फू...फू...

मोठ्या मामाचं व लहान मामाचं पण कोण कौतुक! आंबा मोहरला आहे. चिंच फुलली आहे. वाऱ्याने आंब्याचं झाड गोल गोल फिरल्यासारखं वाटतं आहे. आंब्याच्या झाडालाच प्रश्न विचारला जातो, 'काय रे आंब्या, तुझ्या पुढ्यात दिसणारं हे जोत व भाताचं शेत कुणाचं?' आंबा उत्तर देतो, "मामासारख्या भल्या माणसाचं." पुनः आंब्याला प्रश्न विचारला जातो, "तुझ्या पाठीमागचं जोत व भातशेती कुणाची?" आंबा उत्तरतो, 'लहान मामासारख्या भल्या माणसाचं......'

आमा डुलला चिंच फुली,
घाल घाल आम्या गॉलाटा
पुढचा रे ज्वात-भात कोणाचा?
मामासाऱ्या रायाचा
आमा डुलला चिंच फुली
घाल घाल आम्या गॉलाटा
त्याच्या पाटला रे ज्वात-भात कोणाचा?
लहानग्या मामासाऱ्या रायाचा
आमा डुलला चिंच फुली
घाल घाल आम्या गॉलाटा

तर आणखी एका गीतात मामा घाटावर जातो. बैल आणायला. कोकणातून मामा घाटावर जातो तर घाटावरून सगळे कवडे पळून खाली कोकणात येतात. (मामा शिकारी असला पाहिजे...कवड्याना त्याचा जबरदस्त धाक पण असला पाहिजे.) मामा घाटावरून ढवळ्या रंगाचे पाडे घेऊन येतो. त्यांचं जोत बांधतो. जांभळीच्या झाडाखालून वाट आहे. जांभळीची जांभळे पिकली आहेत. पण गोऱ्या मामाला मिळतं ते मात्र पिकलेलं जांभळ नव्हे, तर त्याच्या देठाला डिंक असलेलं! अर्धकच्चं! कारण काय तर गोरा मामा असतो 'चोर चोर'......

घाटावरसून घाटावरसून कवडे पळान् गेले
मामान हाडले धवळे पाडे
धवळ्या पाड्यांचा ज्वात ज्वात
जांबळी बुडल्यान वाट वाट
जांबळीचा जांभाळ पिकयाला। पिकयाला
गोऱ्या मामाक दिकयाला। दिकयाला
गोरो मामा चोर चोर......

मामाची दोन दोन ओळीत रेखाटलेली भावचित्रे खालीलप्रमाणे आहेत. एक गीतकार एका सासरी गेलेल्या मुलीची भावना अवघ्या दोन ओळीत व्यक्त करतो.

**बकुळयाच्या झाडावाटे । माझ्या मामाने**
**रस्ता केला**
**वंशाला करंडा फणी । माझ्या मामीला पाठविली**

तर दुसऱ्या एका कडव्यात मामाचं वर्णन कसं केलं आहे पहा.

**रस्त्यावरचे कावळे । रस्त्यावरचे कावळे**
**सारी पत्त्यानी खेळत होते । माझे मावळे**

मला उपलब्ध झालेल्या कोकणी लोकगीतांत पडलेले मामा-मामीच्या जीवनाचं प्रतिबिंब हे अशा प्रकारचं आहे ! त्यांच्या संपूर्ण जीवनाचं अर्थातच ते प्रतिबिंब मानता येणार नाही. खरं म्हणजे मामा मामीबद्दल वाटणाऱ्या भावना किंवा भावछटा ह्या साध्या सरळ गीतांतून अभिव्यक्तीचे कोणतेच व कसलेच अवडंबर न माजविता व्यक्त झालेल्या आहेत. ह्या गीतांतून पडलेले कोकणी मनाचे प्रतिबिंब स्वच्छ, स्पष्ट व अगदी नितळ असे आहे. प्रामुख्याने हे खेड्रत मनाचे चित्रण आहे व ते बहुजनसमाजाकडून व्यक्त झालेले आहे. ह्या कोकणी लोकगीतांचं लोकजीवन समृद्ध करणारं हे शब्द व भावधन मला सापडलं ते कुणा पांढरपेशाच्या घरात मुळीच नव्हे ! तेल्या तांबोळ्याच्या झोपडीवजा घरादारांतून हिंडून हे धन गोळा केलेलं आहे. एक काळ होता की आजोळसारखी अपूर्वाईची बाब कोकणी जीवनात दुसरी कोणतीच नव्हती. मामा इतकी दुसरी प्रिय व्यक्ती नव्हती व मामी इतकी आवडीची असूनही चहाड्या करण्याजोगती व खोटं नाटं मायेचं भांडण करता येण्यासारखी जिव्हाळ्याची स्त्री नव्हती. थट्टा करायची, खोड काढायची, चहाडी करायची तर ती आपली मामीची ! ती सुद्धा सरळ मामाकडे. मामा तरी कसे ? कुणी थोरला मामा तर कुणी धाकटा मामा. अर्थातच थोरली मामी आणि धाकटी मामी आलीच. कुणी गोरा मामा तर कुणी चोर मामा. ह्या सर्व भावछटा व्यक्त करताना गीतकार कुठेच चुकूनही कडवटपणाचा स्पर्श सुद्धा आपल्या विषयाला होऊ देत नाहीत. उलट त्या गीतांतला स्फटीकासारखा पारदर्शक व बहुकोनी प्रांजलपणा हृदयाच्या गाभ्यापर्यंत थेट जातो. निरोगी, निरागस व निर्मळ मनाची काही वेगळीच व हुरहूर लावणारी छाप पाडून ही गीते अखंड लळा लावतात. ज्यानी ही गीते लहानपणी दोरीच्या झोपाळ्यावर बसून धोळक्याने स्वतः तारस्वरात म्हटली, इतरांनी म्हणताना ऐकली व ऐकता ऐकता केवळ शाब्दिक नव्हे तर खराखुरा आजोळचा आनंद लुटला, मामा-मामीचं प्रेम मिळविलं, त्यांच्याकडून कौतुक करून घेतलं, (त्यांच्या खोट्यानाट्या बालिश चहाड्या करून त्यांच्यांत लटकी लुटुपटीची भांडणे लावली व ती मनसोक्त पाहिली व पुनः मिटविली...न कळता बरं !)......त्यांच्या सान्निध्यात आपल्या शैशवाचा विकास होऊ दिला, त्याना तर ह्या कोकणी गीतांची आठवण पावलोपावली येत असली पाहिजे. 'ते हि नो दिवसा गता' अशी हळहळ त्याना निरंतर वाटत असली पाहिजे.

निदान माझी तरी तशी अवस्था आज होऊन राहिली आहे. कारण आज पुनः कोकणात गेल्यावर ते वातावरण नष्ट झालेलं पहावं लागत आहे. आमच्या मुलाबाळांना तर तो आनंद आता क्वचित कुठे अभावाने मिळाला तर मिळतो आहे. बहुशः त्या निर्मळ व निर्व्याज आनंदाला ती आता पारखी झाली आहेत. आता ग्रामीण जीवन पूर्वीपेक्षा गुंतागुंतीचे झाले आहे व बाळजीवनावरही त्याची कृष्णछाया घनदाटतेने पडू लागली आहे. मग वाटतं आम्ही अजूनही ती गाणी निदान आठवून ओठावर त्यांची गुणगुण काही काळ तरी टिकवून धरतो, मनाने पुनः भूतकाळात जातो व लहान होतो, पुनः पुनः मनानेच आजोळला जातो व मामा मामींना आठवतो व भेटतो, हे काय आमचं भाग्य कमी मोलाचं? कोकणी लोकगीतांचा ताळ सूर व शब्द आठवणारं कोकणी मन (कोकणातून दूर गेल्यावर) हे काहीसं असं हुरहुरणारं आहे असं मी म्हटलं तर ते चुकीचं होईल असं मला तरी निदान वाटत नाही...

# प्र. श्री. नेरुरकर यांचे काही प्रकाशित साहित्य

## ललित लेख :

१. अनवाणी चाल

२. माझ्या आजोळची वाट

३. बकुळीची फुले

## लघुकथा संग्रह :

१. प्रवासिनी
(महाराष्ट्र राज्य साहित्य पारितोषिक १९७३)

२. रोम्बाट

३. बेट नावाचे माणूस

## कादंबरी :

१. किरिस्ताव

२. कॉकटेल

३. कोण्या एका देशात कोणे काळी

## नाटक :

१. अशांतता ! शाळा चालू आहे

## प्रवासलेख :

१. मॉरिशस डायरी

## बालवाङ्मय :

१. हौसा कथा : भाग १

२. हौसा कथा : भाग २

३. सुब्रह्मण्यम भारती (चरित्र)

## इंग्रजी :

१. On the Pavement of Life
(कवी नारायण सुर्वे यांच्या कवितांचा इंग्रजी अनुवाद)

२. Karmaveer Bhaurao Patil (इंग्रजी अनुवाद)

## मुलाखत - डायरी - पत्रे :

१. अक्षरगंधर्व : सदानंद रेगे

हा कोकणी लोकगीतांचा संग्रह म्हणजे कोकणी सुशिक्षित व सुबुद्ध माणसाला कोकणच्या लोकजीवनाचा व लोकसाहित्याचा शोध व अर्थ धुंडाळण्याच्या दृष्टीने करावयाचा आरंभीचा म्हटले तर प्राथमिक बाळबोध व लहानसा खरं म्हणजे तुटपुंजाच संशोधन प्रयोग आहे. या संग्रहातील गीतरुपाने संकलित झालेला कोंकणी लोकसाहित्याचा ठेवा हा, तसे पाहिले तर 'कच्चा माल' (raw material) आहे. त्यातून उद्याच्या कोकणी मातीत जन्मलेल्या कुणाही कोकणप्रांताच्या सुपुत्राला परिपक्व असा कोकणी लोकसाहित्याचा ठेवा (finished product) चिकाटीच्या व निष्ठावंत अशा संशोधकवृत्तीने कोकणी माणसांना व कोकणाबाहेरील लोक-साहित्याच्या अखिल भारतीय भाषांतील अभ्यासकांना उपलब्ध करुन देता येईल. या कोकणी लोकगीतांतून उमटलेला कोकणी माणूस, मग ती स्त्री असो, पुरुष असो, लहान मूल असो वा तरुण तरुणी असोत, मोठा मानवी स्वभावाचा इरसाल नमुना आहे यात संशय नाही. हा या लोकसाहित्यात उमटलेला कोकणी माणूस वरपांगी काहीसा तिरसट, एकांगी, तुच्छतावादी (cynic) व माणूसघाणा जरी वाटत असला तरी आतून तो त्याच्याच गावात खडका पाषाणांतून खळखळा पाझरणाऱ्या झऱ्याच्या किंवा झरीच्या पाण्यासारखा निर्मळ, प्रेमळ व परस्पर आपुलकीची ओढ लागलेला असा ससंवेद्य व हृद्य माणूस आहे. कोकण परिसराच्या काहीशा दरिद्री वातावरणात तसा तो मनाने खरोखरच श्रीमंत आहे. रीतीरिवाज, लोकाचार, सामाजिक रूढी यात तो गुंततो पण अडकून रहात नाही.

— प्रस्तावनेतून